आदान प्रदान

# कोमजलेला चंद्र

उर्पेद्र किशोर दास
अनुवाद
नागनाथ कोत्तापल्ले



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# भूमिका

भारतातील इतर प्रांताप्रमाणेच ओरिसा साहित्यातही कादंबरी हा वाङ्मय प्रकार मागील शतकाच्या शेवटच्या तीन दशकातच अस्तित्वात आला. हा वाड.मय प्रकार इंग्रजी कांदबरीचा आदर्श समोर लिहिला जात होता, हे सांगणे आवश्यक आहे. उमेशचंद्र सरकार यांनी लिहिलेली आणि १८८८ मध्ये प्रकाशित झालेली 'पद्ममाली' ही पहिली संपूर्ण ओडिया कादंबरी मानली जाते. ह्या पुस्तकाच्या प्रकाशनापूर्वी दहा वर्षे आधी रामशंकर राय यांनी लिहिलेल्या 'सौदामिनी' या ऐतिहासिक कादंबरीचा काही भाग तत्कालिन मासिकांमधून क्रमशः प्रसिध्द झालेला होता. नंतर ते पुस्तकरूपात प्रकाशित होऊ शकले नसल्यामुळे, एकंदरीत उमेशचंद्रालाच ओरिसाचे पहिले कादंबरीकार म्हणून ओळखले जाते.

'पद्ममाली' ही ऐतिहासिक कादंबरी आहे. ओरिसातील नीलगिरी नामक एका प्राचीन किल्ल्यामध्ये इ. स. १८३५ मध्ये घडलेल्या एका सत्य घटनेला केंद्रस्थानी कल्पून ही लिहिली गेली. ही ओरिसाच्या इतिहासातील एखाद्या अविस्मरणीय घटनेवर किंवा कुणा इतिहास प्रसिध्द व्यक्तीला केंद्रस्थानी ठेऊन लिहिली गेलेली नाही. तर दोन शेजारच्या राज्यातील बंडखोरी, संघर्ष आणि स्त्रियांचे अपहरण यासारख्या रोमांचकारी घटनांना यात केंद्रस्थानी कल्पिले आहे. अर्थात यात मुळीसुध्दा शंका नाही की कथावस्तू तत्कालीन ओरिसातील किल्ल्याचे (गढजात) एक वास्तव चित्रत आहे. ओरिसात इंग्रजी शासन स्थिर झाल्यानंतरच्या तीस वर्षातील उत्कलच्या सामाजिक जीवनाचे चित्रात या कादंबरीत मिळते. उडिया कादंबरीच्या बाल्यावस्थेतील हे कांदबरीलेखन असूनही हिचे वर्णन सरस आणि प्रशंसनीय असेच केले जाते. कथा प्रेमींना ही आजही आनंद देऊ शकते.

पुढचे कादंबरीकार म्हणून रामशंकर यांचे नाव उल्लेखनीय आहे. त्यांच्या 'विवासिनी' (रचनाकाल १८९२-९३) या कादंबरीत ओरिसातील मराठाकालीन कुशासन, अत्याचार आणि दुष्काळाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली एक कल्पनात्मक अशी प्रणयकथा आहे. या प्रकारच्या काल्पनिक आणि ऐतिहासिक विषयांच्या संयोगातून कादंबरी लिहिण्याची पध्दती रूढ असतांनाच उडिया कादंबरीक्षेत्रातील युगप्रवर्तक फकीर मोहन यांचा उदय झाला. त्यांनी लिहिलेल्या 'छ : मांण आठ गुंठे (प्रथम प्रकाशन १८९८), 'लछमा' (१९०३), 'मामू' (१९१३), 'प्रायश्चित' (१९१५) इ. कादंबऱ्या उडिया साहित्यातील उत्कृष्ट निर्मिती मानली जाते. 'लछमा' या ऐतिहासिक कादंबरीशिवाय फकीर मोहन यांच्या इतर तीन कादंबऱ्यांमधून लोभ, अहंकार,

कुसंस्कार ऐतिहासिकयांच्या परिणामांचे चित्रण करीत असतांनाच ते समाजातील अत्यंत सामान्य स्त्री पुरुषांच्या जीवनाचे अतिशय वास्तव आणि जिवंत असे चित्रणही करीत जातात. फकीर मोहन यांच्या निर्मितीकाळातच आपल्याला असे दिसते की, समाजातील सामान्य माणसाची साहित्यातून प्रतिष्ठापूर्वक स्थापना होते आहे. याशिवाय फकीर मोहन यांची वर्णनशैलीही अत्यंत सरस आणि चित्ताकर्षक आहे. हास्योत्पादक तसेच उपहासपर व्यक्तिचित्रण आणि वातावरण निर्मिती करण्यात, तसेच प्रादेशिक चित्रण करण्यात फकीर मोहन हे उडिया साहित्यात अद्वितीय ठरतात. त्यामुळे त्यांना उडिया कादंबरीमध्ये एका नव्या परंपरेचे प्रवर्तक, तसेच मौलिक साहित्याची निर्मिती करणारे साहित्यिक मानले जाते.

फकीर मोहन यांच्या कादंबरीरचनापध्दतीने त्यांच्या समकालीन इतर लेखकांना प्रभावित केले. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर उडिया कथासाहित्यात आणि कादंबरी वाङ्मयात एक प्रकारची शिथिलता आली. ही अवस्था नष्ट करण्यासाठी आणि उडिया कादंबरी लोकप्रिय करण्याच्या संदर्भात 'मुकुर' या नियतकालिकाचे संपादक ब्रजसुंदर दास यांनी पुष्कळ प्रयत्न केले. त्यांनी या नियतकालिकाच्या माध्यमातून 'मुकूर' कादंबरी ग्रंथमालेचे प्रकाशन केले. त्याचप्रमाणे 'सहकार' या नियतकालिकाच्या संपादकांच्या प्रयत्नामुळे 'आनंदलहरी कादंबरीमाला' आणि कादंबरीला वाहिलेले मासिक 'भारती' प्रकाशित झाले. या दोन संस्थामुळे आणि प्रकाशन व्यवस्थांमुळे बहुसंख्य उडियाकादंबऱ्या वेळच्या वेळी प्रकाशित आणि वितरित होऊ लागल्या. हे स्वतंत्रपणे सांगण्याची गरज नाही.

फकीर मोहन यांच्यानंतर कादंबरीकारांमध्ये चिंतामणि महांति आणि कुंतलाकुमारी साबत ही नावं उल्लेखनीय आहेत. चिंतामणि यांनी सामाजिक कथावस्तू केंद्रस्थानी ठेवून कादंबरी निर्मिती केली. तरीही त्यांची निर्मिती प्रामुख्याने कथानक प्रधान अशीच आहे. पात्रांच्या मानसिक क्रियाप्रतिक्रियांचे विश्लेषण त्यांच्या कादंबरीत फारसे येतच नाही. असे म्हटले तरी चालेल.

कुंतला कुमारी यांनी पाच कादंबऱ्या लिहिल्या आहेत. या कादंबऱ्यांमधून स्त्रियांच्या व्यक्तिमत्वाचे वास्तवचित्रण झालेले आहे. चिंतामणींच्या तुलनेत त्यांच्या सर्वच व्यक्तिरेखा अधिक क्रांतिकारक, पुरोगामी आणि संस्कारशील अशा आहेत. यावेळी ऐतिहासिक कथानकांच्या आधारे पुष्कळशा कादंबऱ्या लिहिल्या गेल्या होत्या. या प्रकारच्या कादंबरीकारांमध्ये चिंतामणि आचार्य, तारिणीचरण रथ, रामचंद्र आचार्य, श्रीधर महापात्र इत्यादींची नावे घेता येतील.

या काळातील विशिष्ट आणि लोकप्रिय अशा कादंबऱ्यांमध्ये नंदकिशोर बल यांच्या 'कनकलता' (१९२५), बैप्लवचरणदास यांच्या 'मोने मोने' (१९२६) आणि उपेंद्रकिशोर दास यांच्या 'माला जोन्ह' (मेलेला चंद्र : १९२८) या कादंबऱ्या प्रसिध्द आहेत. 'मोने मोने' ही उडिया साहित्यातील पहिली मनोविश्लेषणात्मक कादंबरी म्हणून ओळखली जाते. याशिवाय कान्हूचरण महांती, गोपीनाथ महांति, कालिंदीचरण पाणिग्राही, गोदावरीश महापात्र, राजकिशोर पटनायक, नित्यानंद महापात्र, कमलाकांत दास, चक्रधर महापात्र, इत्यादींनी दुसऱ्या महायुध्दापूर्वीपासून ते स्वातंत्र्यसंग्रामानंतरच्या कालखंडानंतरही पुष्कळशा कादंबऱ्या लिहून उडिया कादंबरी वाङ्मय समृध्द तर केलेच पण स्वत:ही यशस्वी झाले. परकीय कादंबऱ्यांची कथानके जशीच्या तशी ठेवून

त्यांना उत्कलीय रूप देण्याच्या संदर्भात गोदावरीश मिश्र आणि गोदावरीश महापात्र यांची नावे आधी घेतली जातात. कालिंदीचरण यांच्या 'माटिरो मोणिषो' (मातीचे पुतळे) या कादंबरीबद्दल उडिया साहित्यातच नाही तर भारतीय साहित्यातही पुष्कळ चर्चा झाली आणि तिला प्रसिध्दीही मिळाली. वास्तव आणि आदर्श यातील समतोल साधण्यात आल्यामुळे परिणामकारक वास्तवाचे समर्थ चित्रण करण्यात ती यशस्वी झाली. त्याग, संयम, संहिष्णुता, उदारता आणि अहिंसा यांचा पुतळाच जणू असा एका बरजू नावाच्या शेतकऱ्याच्या जीवनाचे जे चित्रण केले आहे ते उच्चप्रतीचे आहे. कारस्थानी व्यक्तींच्या वाईट सल्ल्यामुळे हातावर पोट असणाऱ्या एका कुटुंबावर प्रचंड संकटं येतात तेव्हाही बरजू सारख्या आदर्श व्यक्ती आपल्या त्यागाच्या बळावर कशाप्रकारे संकटातून मार्ग काढतात हे या कादंबरीत चित्रित केले आहे.

राजकिशोर पटनायक यांच्या कादंबऱ्यांमध्ये मनोविश्लेषणासंबंधी अधिक प्रिती आणि आपल्याच भावनामध्ये हरवून जाण्याच्या वृत्तीची जाणीव होते. हृदयाच्या गूढतम अशा रहस्यांचा शोध हा त्यांच्या कादंबरीचा विशेष होय. नित्यानंद महापात्र यांच्या कादंबऱ्याही सूक्ष्म मनोविश्लेषणात्मक आणि भावनाप्रधान असल्या तरी कथात्मकता आणि कल्पनाशक्तीच्या समृध्दीबरोबरच विचारपरिप्लुततेच्या दृष्टीनेही त्या सदृध्द आहेत. समकालिन राजकीय विचार आणि अहिंसात्मक जातीय संघर्षाच्या पार्श्वभूमीवर लेखन करणारे लेखक म्हणून हरेकृष्ण मेहताब आणि रामप्रसाद सिंह यांची नावे उल्लेखनीय आहेत.

आधुनिक उडिया कादंबरीमध्ये निर्मितीसंख्या आणि लोकप्रियता या दोन्हीही दृष्टीने कान्हुचरण यांच्याशी कोणीही स्पर्धा करू शकणार नाही. मागील पन्नास वर्षात त्यांनी पन्नासपेक्षाही अधिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांच्या 'का' या कादंबरीस केंद्रीय साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे. कान्हुचरण यांच्या बहुसंख्य कादंबऱ्या प्रणयप्रधान आहेत. स्त्रीप्रेम, अंतर्व्दंव्द इ. बाबी ते अतिशय काळजीपूर्वक चित्रित करतात. त्यांच्या सर्वच बऱ्यांची भाषा सरळ, आवेगयुक्त आणि कोमल अशी आहे. वर्णनशैलीच्या दृष्टीनेही लेखकाने अनेक यशस्वी प्रयोग केले आहेत.

कान्हुचरण यांचे लहान बंधू गोपीनाथ हे आधुनिक उडिया कथासाहित्यात श्रेष्ठ कलावंत म्हणून मान्यता पावले आहेत. प्रामुख्याने आदिवासी जीवनचित्रणाच्या संदर्भात गोपीनाथ भारतीय कादंबरीच्या क्षेत्रात उच्च दर्जाचे कलावंत आहेत. त्यांच्या 'अमृत संतान' या कादंबरीने केंद्रीय साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळवून उडिया साहित्य आणि लेखकाचा गौरव केला. कथाप्रेमी लोकांना त्यांच्या कादंबऱ्या फारशा आवडणार नाहीत, परंतु सूक्ष्म मनोविश्लेषण, क्रिया - प्रतिक्रीयामधील विचार विश्लेषण, आणि प्रादेशिकतेच्या सूक्ष्मतम जिवंत चित्रणाच्या दृष्टीने त्यांच्या कादंबऱ्या यशस्वी आणि अतुलनीय आहेत. 'परजा' 'दादीबुढा', 'अमृत संतान' या कादंबऱ्यांमधून अरण्यात राहणाऱ्यांची प्रकृती आणि जीवनधारा, आदिवासींचे सरळ, सुंदर, रोमांचकारी आणि अपरिचीत असे जीवन अतिशय काळजीपूर्वकरित्या लेखकाने चित्रीत केलेआहे. लेखकाची भाषाशैली आणि वर्णनही वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण असेच आहे. उडिया गद्यशैलीच्या

नव्या नव्या अभिव्यक्तीपध्दती, नि:संदिग्ध उडिया शब्दाचा वापर, सरळ भाषेतून नव्या आवेगमय, कवित्वपूर्ण अशा वर्णनामधून लेखकाच्या असाधारण प्रतिभाशक्तीचे दर्शन घडते. त्यांच्या 'माटीमटाल' या कादंबरीला भारतीय ज्ञानपीठ पुरस्कारही मिळाला आहे. दोन महायुध्दांतर्गत काळात लिहिल्या गेलेल्या कादंबऱ्यांमधून साधारणत:समाजावर संस्कार करण्याच्या दृष्टीला महत्त्व दिले गेले. या काळातील अत्याधुनिक तसेच समकालिन कादंबरीमध्ये आदर्शवादापेक्षा वास्तवाला अधिक महत्त्व दिले गेले. फकीर मोहन यांच्या काळात प्राचीन संस्कृती आणि परंपरेविरुध्द भूमिका घेणारा स्वर मुखर झाला असला तरी जाती अगर सांप्रदायिक भेद नष्ट व्हावे यासाठीही काहीही सूचना नव्हत्या. परंतु समकालिन कादंबरीमधील साऱ्या व्यक्ती स्वत:च्या समकालिन समाजाविरुध्द भूमिका घेण्यात अग्रेसर होत्या. दमन झालेल्या प्रेमाचे वाईट परिणाम आणि अपराधी प्रवृत्तीच्या व्यक्तींना समजून घेऊन सहानुभूतीने चित्रीत करण्याच्या संदर्भात आधुनिक लेखकांचा आग्रह आहे. याशिवाय या युगाच्या नानाविध समस्या, आर्थिक, नैतिक आणि जातीगत विषमता, अविचार, शोषणाविरुध्दचा संघर्ष इ. विषय प्रकट करणे हे बहुसंख्य कादंबऱ्यांचे ध्येय आहे. कादंबरी निर्मितीच्या क्षेत्रात विचार आणि सूक्ष्म निरीक्षण यावर भर देणारे कादंबरी लेखन करण्याच्या संदर्भातही कित्येक कादंबरीकार आग्रही होते.

समकालिन कादंबरीकारांच्या रूपाने ज्ञानेंद्र वर्मा, सुरेंद्र महांति, वसंतकुमारी पटनायक, विभूती पटनायक, शांतनूकुमार आचार्य इ.ची नावे उल्लेखनीय आहेत.

○ ○ ○

ओरिसाच्या एका संस्कृतीसंपन्न आणि खानदानी जमीनदार घराण्यात १९०१ साली उपेंद्रकुमार दास यांचा जन्म झाला. संपन्नता आणि स्वच्छंदतेमतेमध्ये त्यांचे जीवन व्यतित होत होते. बी.ए. मध्ये शिकत असताना त्यांनी असहकार आंदोलनाचे निर्भिडपणे समर्थन केले. इ.स. १९२१ ते १९३१ पर्यंत त्यांनी छोट्या छोट्या खेड्यांमध्ये पायपीट करून संघटन कार्यासाठी त्यांनी आपले जीवन समर्पित केले. परंतु हळुहळू या बाबींना कंटाळून खेडं सोडून ते शहरात कवी आणि कलांचे जाणकार म्हणून स्थायिक झाले. आपल्या स्वप्नांच्या आणि इच्छा आकांक्षाच्या परिपूर्तीसाठी त्यांनी कलांचा आधार घेतला. रंग, कुंचला, लेखणी, फुले, पक्षी आणि शिल्पकला हेच त्यांच्या जीवनाचे आधार राहिले. कदाचित आपल्या स्वभावातील कलाप्रियतेमुळेच ते जनसेवेच्या मार्गापासून बाजुला गेले असावेत. त्यानंतर ते नानाविध फुलांची झाडं आणि पक्षीपालन, चित्र, शिल्पनिर्मिती तसेच कथा, कविता, कादंबरी, संगीत यांची सेवा करणे हेच त्यांचे एकमेव ध्येय राहिले. त्यासाठी त्यांनी आपली सारी जमीन -संपत्ती मागेपुढे न पाहता सहजपणे वाहून टाकली. इ.स. १९७२ साली त्यांचा मृत्यू झाला.

चित्रकला आणि काव्यनिर्मितीच्यासंबंधी बालपणापासूनच त्यांच्या मनात प्रेम होते. त्यांची आई संपादित करीत असलेल्या 'परिचारिका' या नियतकालिकामध्ये त्यांची पहिली कविता प्रकाशित झाली होती. त्यानंतर तारुण्यात ते कथालेखनाकडे वळले. त्यांच्याच कुटुंबाकडून

संपादित होत असलेल्या 'वारूणी' नावाच्या सुप्रसिध्द नियतकालिकामध्ये त्यांची 'कोमेजलेला चंद्र' ही कादंबरी क्रमशः प्रसिध्द झाली होती. ही कलाकृती प्रसिध्द झाल्यानंतर त्यांनी ओरिसाच्या वाचक वर्गाला भारावूनच टाकले. त्यानंतरही त्यांनी अनेक कथा लिहिल्या. त्याबरोबरच त्यांनी बालसाहित्यनिर्मितीवरही आपले लक्ष केंद्रीत केले. त्यांनी लिहिलेली बाल साहित्यातील 'अलीबाबा' (कटक प्रिटिंग कंपनी १९३२), 'काऊरी देशोरे गऊरी' इ. पुस्तके उल्लेखनीय आहेत. दुसरे पुस्तक 'अलीस इन वंडरलँड' या पुस्तकाच्या आधारे लिहिले गेले आहे.

आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी संशोधनात्मक स्वरूपाचे कार्य केले. या कालात 'मेघदूत', 'गीत गोविंद' आणि 'श्रीमद्‌भगवतगीता' यांचा त्यांनी अनुवाद केला. 'प्राच्य विद्या संपत्ती' नावाच्या एका संशोधन संस्थेच्या निर्मितीच्या संदर्भात त्यांनी अनेकांचे सहकार्य मिळविले आणि ती संस्था प्रगतीपथावर नेण्याचा प्रयत्न केलेला होता. 'विष्णुपुराण' आणि 'भागवत' या ग्रंथांचे त्यांनी केलेले गद्यानुवाद म्हणजे या दिशेने टाकलेली महत्त्वाची पावलंच होतं. त्यांच्या मृत्यूनंतर आजपर्यंत हे 'साहित्य अप्रकाशित आहे. एक चित्रकार म्हणून समीक्षक आणि चित्ररसिकांनी त्यांच्या अनेक चित्रांची प्रशंसा केली. त्यात 'लक्ष्मी', 'पल्लीबधू' इ. उल्लेखनीय आहेत. स्थूल मानाने असे सांगता येईल की, एक कलावंत आणि कथाकार म्हणून सृष्टीशी त्यांचे आंतरिक नाते आहे. वृध्दापकाळी त्यांनी हे स्वतःच सांगितले आहे. आज वृध्दापकाळी डोळ्यातला प्रकाशच हरवल्यामुळे बाहेरचे सृष्टीसौंदर्य पाहणे ही बाब आता माझ्यासाठी कायमची समाप्त झाली आहे, पण अंतर्यामी मात्र त्याच रूपलक्ष्मीचा आवाज मी ऐकतो आहे. रात्रीचे तारांकित आकाश हेच जिचे वस्त्र आहे, दूरपर्यंत पसरलेल्या जंगलरेखा म्हणजे जिचा अंबाडा आहे, संध्याकाळचा गुलाबी प्रकाश म्हणजे जिचा आळता आहे आणि संपूर्ण सृष्टीचा जीवनप्रकाश जिच्या पायाखालून प्रत्यही वाहात असतो - ते सौंदर्य पाहणे माझ्यासाठी तरी संपलेले नाही. केवळ एवढं मात्र माहीत आहे की, सौंदर्याची तपश्चर्या म्हणजे एका दिवसाची तपश्चर्या नाही -जन्माची तपस्या आहे. म्हणून मला इतकंच कळलंय की आजपर्यंत - कलेच्या संदर्भात मी फारसं काही समजू शकलो नाही.

'कोमेजलेला चंद्र' ही छोटीशी कादंबरी लिहून लेखक आज उडिया कादंबरी क्षेत्रात अमर झाले आहेत. हिचे कथानक छोटेसेच आहे. एका छोट्याशा गावातील मध्यमवर्गीय ब्राम्हण परिवारातील मुलगी सत्यभामा हिला नरहरी नावाच्या एका काळ्या कभिन्न, वृध्द, विधुर आणि श्रीमंत जमीनदाराबरोबर विवाह करावा लागतो. सतीच्या किशोरावस्थेतील प्रिय मित्र लोकनाथ त्याच गावात राहणारा एक शिक्षित तरुण आहे. त्याच्या विरोधाला न जुमानता विवाह होतो. सौरभी या नरहरीच्या रखेलीमुळे सतीचे वैवाहिक जीवन कारुण्यपूर्ण आणि असहाय होते. शेवटी गावापासून दूर असलेल्या धवलेश्वर या नदीच्या किनारी प्रचंड वादळ आणि गर्दीचा फायदा घेऊन तिचा नवरा व त्याची रखेली सौरभी हे सतीला अतिशय चलाखीने तिथेच सोडून गावाकडे निघून येतात. अशा असहाय परिस्थितीमध्ये अचानक सतीला तिच्या 'मनातला पुरुष' नाथ भैया दृष्टीस पडतो. नाथ तिला गर्दीतून वाचवतो आणि दुसऱ्या दिवशी तिच्या नवऱ्याकडे नेऊन सोडतो. परंतु

परपुरुषाबरोबर रात्र घालविल्याचा आरोप ठेऊन तिचा नवरा तिला स्वीकारीत नाही. उपजीविकेयाच दरम्यान पटकीच्या साथीमुळे सतीच्या आईवडिलांचा मृत्यू झालेला आहे. ही दुःखद बातमी सतीला न सांगताच तिला सरळ कटक शहराकडे नेणे नाथच्या दृष्टीने आवश्यक ठरते. परंतु नाथ शहरामध्ये करून ते दोघेही आपल्या गावी परत येतात. परंतु गावातील शाळा मास्तर अचुतिचे कपट, गावकऱ्यांचे खनदाणीपण आणि सामाजिक लांछनयांनी तिला जीवन जगणे अशक्य केले. तिचा एकमेव आधार असलेल्या उदारमनाच्या नाथभैयाबरोबर संबंध जोडणे आता अशक्य आहे, हे जसे सतीच्या लक्षात आले तसेच नाथभैयाचे हेतू चांगले असूनही तो केवळ आपल्यासाठीच कान डोळे मिटून इतके सगळे सहन करतो हेही तिच्या लक्षात आले. निर्दयी समाजातील आपल्याच लोकांकडून मिळणारी क्रूर आणि सहानुभूतीशुन्य वागणूक तिने खूप खूप भोगली. शेवटी एके दिवशी रात्रीच्या घनघोर शांत वेळी ती नाथभैयाच्या नावे शेवटचे आणि एकुलतेएक पत्र लिहिते आणि निघून जाते -अगदी जीवनाच्या दुसऱ्या किनाऱ्यावर. या प्रकारे कादंबरीचा शेवटही अतिशय प्रभावी झाला आहे.

सतीचे आत्मकथन हेच या कादंबरीच्या लेखनाचे स्वरूप असल्यामुळे इतर व्यक्तींचे विस्तारपूर्वक चित्रण करण्याला येथे वावच नाही. तरीही सतीच्या प्रतिक्रियांच्या माध्यमातून इतर व्यक्तींचे कौशल्यपूर्ण चित्रण करण्यात लेखक यशस्वी झाला आहे. सतीचे आईवडील, तिचे प्रिय नाथभैया, वृध्द पती नरहरी आणि त्यांची रखेली सौरभी, छोटे मूल नटो, देवी -देवतांच्या पूजेमध्ये व्यग्र असणारी सासू, विश्वासू नोकर सईता, दुष्ट ग्रामीण शिक्षक अचुति, इत्यादि व्यक्तींचे अतिशय प्रभावी असे चित्रण लेखकाने केले आहे.

कथानकाच्या स्वाभाविकतेबरोबरच व्यक्तीचित्रणांची स्वाभाविकता, सूक्ष्म मनोविश्लेषणात्मक क्रिया -प्रतिक्रियात्मकतेमुळे या कलाकृतीला सुघड अशा शिल्पाचे रूप मिळाले आहे. खेड्यातील एका सरळ मनाच्या किशोरीच्या लग्नासंबंधीच्या प्रतिक्रिया, समवयस्कांबरोबरचा थट्टाविनोद, ग्रामीण जीवनातील मधुर अनुभव, आईवडिलांचे प्रेम, नवतरुणीच्या मनात निर्माण झालेली छोट्या मुलासंबंधीची ममता, कौमार्यातील प्रथम प्रितीचा अनुभव, वृध्द, कुत्सित आणि हृदयहीन नवऱ्याबद्दल वाटणारी वैराग्य भावना आणि घृणा, सामाजिक बंधने आणि रूढीमधून प्रकटलेला एका तरुणीचा संयत अनुराग, धैर्य आणि शुध्द चारित्र्याची शक्ती, जमीनदारांचा गर्व, लंपटपणा, समाजाचे स्वामी म्हणवून घेणाऱ्या ग्राम प्रमुखांचा हृदयहिन निर्णय आणि कपट या सगळ्यांना या कादंबरीत लेखकाने अतिशय छोट्याशा अवकाशात अतिसहजतेने व्यक्त केले आहे.

सरळ भाषा आणि नेहमीच्या वापरातल्या ग्रामीण बोलीत लिहिल्यामुळे ही कादंबरी अधिकच वाचनीय आणि लोकप्रिय बनली आहे. ठिकठिकाणी अतिशय काव्यात्म अशी वर्णने आहेत. 'कोमेजलेला चंद्र' कादंबरीचे नामकरणही मोठे योग्य असेच आहे. वास्तवाच्या प्रखर आघातामुळे जीवन कशा प्रकारे कोमेजून जाते हेच या कादंबरीत प्रकट केले गेले आहे.

या कादंबरीचे नाट्यरूपांतर होऊन त्याचे प्रयोग रंगभूमीवर झाले आहेत ही गोष्ट या कादंबरीच्या लोकप्रियतेची निदर्शकच आहे. या कादंबरीवर उडिया भाषेत चित्रपटही निर्माण झाला आहे. इंग्रजी आणि भारतातील इतर प्रादेशिक भाषांमधून अनुवादित झाल्यावर हिचे महत्त्व अधिकच लक्षात येईल याबद्दल दुमत नाही.

**-जानकी वल्लभ महांती**

वैशाखाच्या रणरणत्या उन्हात एकाएकी ढगांचा जादुगारी स्पर्श व्हावा त्याप्रमाणे कमालीच्या असहाय जीवनातही असा एखादा मधुर क्षण येतो की, संपूर्ण जीवनच अनोळखी मार्गावर जाऊन पोचते. त्याला मधुर क्षण तरी कसा म्हणावा? एखाद्याच वेळी क्षणभरासाठी मन भरून सुखाची प्रतीती देणाऱ्या आणि आयुष्यभरासाठी व्यर्थ होणाऱ्या त्या क्षणाला कोणी काही म्हणो मी तर मधुर क्षण म्हणू शकणार नाही. हाय! या दुनियेतल्या माझ्या अत्यंत असहाय जीवनातील त्या क्षणभराच्या सुखसौभाग्याचा मोह मी पडू दिला नसता आणि त्याकडे दुर्लक्ष केले असते, तर आज मला नदीत बुडून मरायचीवेळ आली नसती.

माणूस आपल्या क्षणभराच्या अभिमानासाठी जीवनात केवढी मोठी चूक करू शकतो याचे उदाहरण म्हणजे माझ्या जीवनातील प्रत्येक क्षण आणि प्रत्येक कण आहे. त्यामुळे दहावीस लोकांपुढे आपल्या व्यर्थ जीवनातील सत्य सांगण्यास मला मुळीसुध्दा भीती वाटत नाही. आणि भ्यायचं तरी कोणाला? जेव्हा भीती वाटायला पाहिजे होती तेव्हा कोणी देव-देवता मला दिसली नाही. आणि आता, जेव्हा सगळेच संपलेले आहे तेव्हा कोणाला घाबरून तरी काय फायदा?

मी जन्मले तेव्हा वडिलांनी अतिशय भाविकतेने माझे नाव सत्यभामा ठेवले. माझ्यातील कोणता गुण पाहून त्यांनी माझ्यासाठी हे नाव निवडले, कोणास ठाऊक. माझ्या आतबाहेर तर या नावासारखं काही नाही. माझ्या जिद्दी स्वभावामुळेच तर मी बरबाद झाले होते. त्यातही एकुलती एक मुलगी असल्यामुळे माझी घमेंड इतकी वाढली होती की, आमच्या घराशिवाय इतरांच्या घरातही कधी कधी त्याची चर्चा होत असे. एकुलती एक मुलगी असल्यामुळेच तर आईवडिलांनी डोळेझाक केलेली होती. त्यामुळेच तर माझा घात झाला. कसा झाला ते सांगते आता -

त्या दिवशी दुपारच्या टळटळीत उन्हाला घालवीत आषाढातील पहिल्या दिवसासारखे काळेभोर मेघ दाटून येऊ लागले होते. गावाच्या बाजूला असलेल्या आमच्या अमराईत वारा जोरात गरजत होता. स्वयंपाक-पाणी आटोपून आई लवरकच झोपायला गेली होती. पावसाळी हवा पाहून का कोणास ठाऊक मला आपल्या आजुबाजूला हिंडून यावे असे वाटले. आईचा डोळा चुकवून पानाच्या डब्यातील दोन पान आगावू लावून घेऊन मी बाहेर पडले. बाहेरच्या पायऱ्यांवर पाऊल ठेवताच मागून कुणीतरी आवाज दिला -'सती'.

चमकून मागे पाहिले -बाहेरच्या खोलीत बसून वडील पोथी लिहीत होते. मी काष्टवत तिथेच उभी राहिले. भीतीने अंतःकरणातील धडधड वाढली. मला उभी पाहून त्यांनी विचारले, ''कुठे जात होतीस या वेळी? गावात गस्त घालायला, का?'' अरे, इतक्या सगळ्या गोष्टी यांच्या लक्षात कशा आल्या? मला गप्प पाहून ते म्हणाले, ''तुझ्या आईला बोलव''

आत जाऊन मी आईला उठवलं. ती डोळे चोळत बाहेर आली. मी दाराच्या आड उभी राहून

ऐकलं. वडील विचारीत होते, ''सतीला कुठे बाहेर जाण्यासंबंधी तू सांगितलं होतस का?''

''नाही बरं, का? आईनं आश्चर्याने विचारलं. वडील म्हणाले, 'ती नेहमी बाहेर उंडारत राहते ही बाब तुला खटकणार नाही पण गाववाल्यांच्या नजरांना खटकणारच. ती आता अकरा वर्षाची झाली आहे. उद्या नाही परवा तिचे लग्न होईल. तिला अशा वेळी भटकू तरी कशी देतेस, ते मला कळू दे.' कोणाला तरी शोधत तिची नजर एकवेळ चारी दिशांना फिरून आली. कदाचित मी दिसले असते तर आपल्या या अक्षमतेचा सारा राग तिने माझ्यावर काढला असता. पण कोणी न दिसल्यामुळे म्हणाली, का सगळाचा सगळा दोष माझाच आहे? असंच तुम्हाला वाटतं ना! जरा विचारून तर बघा त्या पोरीला, बाहेर जाण्याबाबत कितीदा मी तिला धमकावले आहे? ती कधीतरी माझे ऐकते का?''

वडील म्हणाले, ''आपल्या घरची मुलगी, बाहेरची माणसं तर तिला आवरायला येणार नाहीत. पण आमचं ऐकतं कोण? मी इकडे सासर शोधीत फिरायचं अन् मुलगी तिकडे घोड्यासारखी नाचत फिरतेय.... रस्त्यांमधून, बाजारांमधून.''

मला अधिक काही ऐकण्याची आवश्यकताच उरली नाही. हलक्या पावलाने मी दारापासून बाजूला झाले आणि खालच्या खोलीत आले. मला वडिलांची फक्त तीच गोष्ट आठवत राहिली -मी इकडे सासर शोधीत फिरायचं....

ही सासर शोधण्याची बाब कोणासाठी होती ते माझ्या लक्षात आले. यासाठीच बाहेर जाण्यासंबंधी आई चिडते. मी म्हणते का? लग्न होताना तर मी अनेक लोकांना पाहिलंय. आमच्या शेजारीच तर त्या दिवशी कमलीताईचं लग्न झालं होतं.

गोवर्धन कानगोईची मुलगी हिरा. तिचेही लग्न झालेले आहे. ती अजूनपर्यंत सासरहून परत आलेली नाही. माझे लग्नही याच पध्दतीने होईल ना, की आणखी कोणत्या वेगळ्या पध्दतीने? यात आणखी काही असेल तर मला माहीत नाही? तरीही लग्नाची बाब मला फार कोड्यात टाकणारी वाटते. असेही असेल की, सर्वच मुलींना असेच वाटत असेल! जसे बिना दरवाजाच्या एखाद्या मंदिरात खूपसे गुप्तधन साठवून ठेवलेले असावे.

अख्खा दिवस मला लग्नाचीच गोष्ट आठवत राहिली. ओढणी घेऊन नवरी होणे, सगळ्यांच्या समोरून वाकत चालणे, हे सगळं खरं म्हणजे मोठं गमतीचं आहे. या लग्नातच तर आम्हा बायकांच्या जातीची किती परिवर्तनं, किती कटकटी आणि सगळी दुनिया सामावलेली आहे ते यावेळी माझ्यासारख्या मुलीच्या लक्षातच आले नाही. जर हे सगळंच त्यावेळी लक्षात आलं असतं तर माझं हे जीवन त्याचक्षणी दुसऱ्याच कुठल्यातरी रस्त्यावर जाऊन उभं राहिलं असतं. आज तुम्हा लोकांसमोर माझ्या निरर्थक जीवनाची निर्लज्ज कहाणी लेखनी हाती घेऊन मांडण्याची मुळीच वेळ आली नसती.

आम्हा हिंदू कुटुंबांमध्ये विशेषतः ब्राम्हण कुटुंबामध्ये या बाबी कोणाच्या लक्षात येत नसाव्यात. आणि येऊन तरी काय फायदा होणार आहे म्हणा? माझ्यासारखंच - पती म्हणजे काय हे

कळण्याआधीच - म्हणजे पाचव्या वर्षीच आमच्या कुटुंबात सगळ्यांची लग्नं होऊन जातात. मग सगळ्याच मोठ्या होऊन एका अपरिचित, अनोळखी माणसाचे घर उभविण्यासाठी निघून जातात. त्यामुळे तर कोणावर प्रलय कोसळत नसतील? त्या दु:खामुळे तर नसेल कोणाला विष खावे लागत? पण माझी बाब -माझी बाब तर सगळ्यांपेक्षा थोडीशी वेगळी आहे. नाही तर आज .... जाऊ द्या झालं त्या गोष्टी.

माझा विवाह आता जवळ आला आहे हे त्यादिवशी माझ्या लक्षात आले. त्यामुळेच आज वडील माझ्याकडे बघून हसत होते. किती मूर्ख मी इतकी साधी बाब त्यावेळी मला समजली नाही.

नदीच्या किनाऱ्यांनी *तण्डीफुलांचा महोत्सव संपवून शरद ऋतू निघून गेला होता. उघड्या वाघड्या शेतांच्या मोकळ्या जमिनीवरील मोरांचे मनमोहक नृत्य संपत आले होते. फुलांनी बहरलेल्या चकोतऱ्यांच्या झाडावर मधमाश्यांची अशाप्रकारे गर्दी असे की, जणू दूरवर कोणी घुंगरू बांधूनच पळत आहे. पानं थोडी थोडी पक्व होत होती तरी शेता-मैदानावर पूर्वीपेक्षा अधिकच हिरवा रंग चढलेला होता, जणू वृक्षामधला हिरवा रंग कोणी काढून घेऊन येथे पसरून गेला होता. पावसाळा अजून पूर्णपण संपलेला नाही. दसऱ्याच्या दिवसातील दहाप्रकारच्या भाताची पिकं हजारो पातींमधून डोलत होती. वाटत होते की, जणू शेतामधल्या गडद पोपटी रंगाच्या गालिच्यावर कोणी बुध्दिबळाचा पटच विणला आहे. गावच्या उत्तरेकडे असणारी एक दरी आमच्या बागेला लागूनच होती. एके दिवशी दुपारी मी लपत छपत तिच्या काठाला जाऊन उभी राहिले.

कदाचित कुठल्यातरी पुजेचा दिवस असावा म्हणून वडील घरी नव्हते. घरून बाहेर पडण्याची ही मला चांगलीच संधी मिळाली होती. अश्विन महिन्याचा शेवट म्हणजे कमळांच्या फुलण्याचा काळ. ऊनही कडाक्याचे पडले होते. कमळ तोडण्यासाठी मी पाण्यात उतरले. फुलं आणता आणता सगळे कपडे ओलेचिंब झाले. परंतु त्याकडे माझे मुळीच लक्ष नव्हते. एकाएकी तलावावर कुणाचा तरी आवाज झाला म्हणून चमकून पाहिलं मी -नाथभैया होते ते.

मला बघून ते म्हणाले, ''बघा या भुताला, भर दुपारी कशी न्हाते आहे.''

नाथ भैयाला पाहून मला मनातल्या मनात राग आला. इतके दिवस कुठे होते कुणास ठाऊक की भेटही होत नव्हती आणि आज आलेत् मोठे सैन्य होऊन दटवायला. त्यांचं म्हणणं ऐकायची मला गरजच काय.

नाथभैया म्हणाले, ''सांगितलं असतंस तर काय तोडून नसती दिली फुलं? तू पाण्यात कशाला शिरलीस?''

मी हातात फुलं घेऊन तशीच पाण्यात उभी राहिले. त्यांच्यापुढे तोंड उघडू शकले नाही मी. ते हसून म्हणाले, ''बरं बुवा, माझ्यावर नाराज झालीस ना? ठीक आहे, आम्हाला माहीत आहे

---

* तण्डीफूल: शरद ऋतूमध्ये नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर एकप्रकारचे पांढरे फूल मोठ्या प्रमाणावर फुलून येते. शरद ऋतू संपताच त्या फुलांचे फुलणेही संपते.

नाराजीचे कारण. सती, माझी आवडती बहीण ना तू, बाहेर ये. एक महत्त्वाची गोष्ट सांगायचीय्''.

मी उत्तर दिले नाही. काठाच्या खाली उतरत ते म्हणाले, ''तू बाहेर येतेस का, मीच येऊ तुझ्याजवळ?''

का कुणास ठाऊक एखादी भलतीच शरमेची गोष्ट असावी तसं त्यांचं म्हणणं वाटलं मला. गडबडीने वरच्या बाजूला येताना मी पाहिलं की, ओली साडी माझ्या छातीला चिकटून बसली होती आणि नाथभैया तीक्ष्ण नजरेने एकटक माझ्याकडे पाहात होते. मी लाजेने चूरचूर होऊन गेले. वाटले, मी इथेच का नाही मेले? आता विचार करते की, खरोखर त्या दिवशी मी मेले असते तर ही कहाणी तिथेच संपली असती. जीवनभरच्या या दु:ख -वेदना कोणाच्या नशिबी आल्या असत्या! कपडे सारखे करीत, अधोमुख अशी मी कशी तरी वर आले. पण त्यांच्या चेहऱ्याकडे पाहणे म्हणजे कत्तलखान्याकडे जाण्यासारखं वाटत होतं. काठावर क्षणभरही न थांबता मी सरळ घरी निघाले, नाथभैयाही माझ्याबरोबर आले. सहा महिन्यांपासून ते गावात नव्हते. शिक्षणासाठी कटकला गेले होते वाटते. आता दसऱ्याच्या सुट्टीच्या निमित्ताने घरी आलेले आहेत. काही दिवस इथेच राहतील. आमच्या घरीही रोज येतील. अशा प्रकारच्या अनेक बाबी ते मला रस्ताभर सांगत राहिले. एव्हाना त्यांच्यावरचा माझा राग गेलेला होता, तरीही मी तोंड काही उघडलं नाही. डोळे उचलून त्यांच्याकडे पाहण्याचीही खूप लाज वाटत होती.

त्यांचे घर आल्यावर ते निघून गेले. त्यांच्या बोलण्यातील आगापिछा काहीमाझ्या लक्षात आला नाही. फक्त एकच वाटले, नाथभैया फार वाईट आहेत.

घराच्या व्हरांड्यात उभी राहून साडी वाळवत असताना कधी कोणास ठाऊक आई येऊन उभी राहिली. खूप चिडलेल्या आवाजात ती ओरडली -'सती'

मी पाहिलं, रागानं तिचा चेहरा लाल झाला होता. डोळे फिरवीत माझ्याकडे पाहात तिनं विचारलं, ''काय ग, कुठं गेली होतीस?''

भीतीनं माझ्या तोंडून शब्द फुटेना. ''फुलं आणायला'' एवढंच म्हणू शकले मी. खूप मोठ्याने ओरडून ती म्हणाली, ''कुलक्षणी कुठली फुलं आणायला गेली होतीस, तर तिथेच का बुडून मेली नाहीस. बाहेर जाऊ नको म्हणून तुला कितीदा सांगितलंय् गं.'' स्त्रियांचे डोळेही किती प्रखर असतात. मी रडत होते ते तिनं इतक्या दुरूनही ओळखलं. क्षणभरात तिचा राग कुठल्या कुठे गेला. जवळ येऊन माझ्या डोक्यावरून हात फिरवीत तिनं मला खूप समजाविलं. आता मी बारा वर्षांची झालेय. उद्या नाही परवा माझं लग्न होईल, अशा वेळी मी बाहेर हिंडत राहिले तर लोक मला काय म्हणतील, यासारख्या अनेक गोष्टी तिनं समजाविल्या. मला सारेच काही कळले नाही फक्त एवढे मात्र कळले की, कदाचित यामुळेच नाथभैया आपल्याकडे पाहत असताना मला लाज वाटली होती.

आजकाल रोज नाथभैया आमच्या घरी येतात. आल्या आल्या माझी चौकशी करतात. जणू माझ्याशिवाय एक क्षणभरही त्यांना राहवत नाही. परंतु त्यांच्या पावलांचा आवाज आला की, मी

कुठंतरी लपून बसते. फुलं तोडण्याच्या त्या घटनेनंतर, का कुणास ठाऊक त्यांच्यासमोर जायला मला लाजल्यासारखं होतं. कधी कधी दुपारच्या वेळी आईजवळ बसून मी रामायण वाचते. कसे कुठून कळत नाही पण नेमके त्यावेळी नाथभैया तेथे येऊन टपकतात. आईजवळ असते म्हणून मी पळू शकत नाही, एरवी आतल्याआत मी पुरती घामाघूम झालेली असते.

एके दिवशी जोराचा पाऊस आला, आमच्या दरवाजाजवळ गुडघ्याएवढे पाणी साचले. मी आणि *बऊल मिळून कागदाच्या होड्या तयार करीत होतो. तर कधी कुणास ठाऊक नाथभैया माझ्यामागे येऊन उभे राहिले ते कळलेच नाही. मी आपली एक होडी करून त्याकडे पाहू लागली. तर नाथभैया म्हणाले, ''अशाप्रकारे कधी होडी करतात का!''

त्यांचा आवाज ऐकून मी चकितच झाले. होडी - फिडी तिथेच टाकून पळून जाण्यासाठी मी उभी राहिले. त्याचवेळी माझ्या साडीची किनार पकडून बऊल तिची होडी पाण्यात सोडण्याचा आग्रह करीत होती. मी लाजून गेले होते. तरीही होडी सोडण्यासाठी ओट्यावरून मी वाकले, तशी नाथभैया म्हणाले, ''काय ही पाण्यात वाहू शकेल?'' असं म्हणत म्हणत त्यांनी माझ्या पाठीचा आधार घेतला आणि पाण्यातली होडी काढून घेतली.

त्यांचं हे वागणं बघून माझ्या शरिरात आग लागली. या हद्दीपर्यंतचं त्यांचं माझ्याशी वागणं म्हणजे एकाप्रकारे अन्यायच होता. चटकन् त्यांचा हात झटकून मी बाजूला उभी राहिले.

थोड्याशा आश्चर्यानेच ते म्हणाले, ''आजकाल तुला झाले आहे तरी काय, माझा चेहरा रागाने लाललाल झाला. स्वतःला सांभाळत म्हणाले, ''मला काही झालंय की तुम्हाला? सतत तुम्ही हे काय लावलंय नाथभैया माझ्याबरोबर? मला....''

''काय मला?'' त्यांनी विचारलं.

''मला हे सगळं मुळीच आवडत नाही.''

मी पाहिले की, एकदम त्यांचा चेहरा पांढराफट्ट पडला आहे. कागदासारखा. उतरलेला चेहरा घेऊन ते हळूहळू तेथून निघून गेले. तरीही मी माझ्या मनाची समजूत घालीत राहिले की, आज मी जे काही केले ते करणं आवश्यकच होतं.

o o o

त्या दिवसापासून आता नाथभैया आमच्याकडे येईनासे झाले आहेत. आणि आले तरी वडिलांजवळ बसून तिकडून बाहेरच्या बाहेर निघून जातात. कधी आईनं बोलावलं तर तिच्याशी चारदोन गोष्टी बोलून निघून जातात. मीही या घरात आहे हे कदाचित त्या दिवसापासून ते

---

* बऊलः सखी. विशिष्ट अशा पूजाअर्चा होऊन दोन मुली एकमेकांच्या बऊल (सखी) होतात. आणि त्या एकदुसरीला बऊल म्हणूनच संबोधतात. एकमेकांचे नाव घेऊन बोलणे पाप समजले जाते.

विसरून गेले असावेत. हे सगळे पाहून मला फार वाईट वाटतं. खरंच त्यांना मी इतक्या कटू शब्दात बोलले. परंतु आज वाटतं, त्यांचा माझ्यावरचा तो राग नेहमीसाठीच माझ्यावर राहिला असता तर फार बरं झालं असतं. माझं हे जीवन याप्रमाणे नेहमीसारखे वेदनांच्या गुंतावळ्यातून मुक्त तरी झाले असतं.

काही दिवसानंतर दुपारच्या वेळी बऊल आमच्या घरी आली. त्यावेळी आई जेवणेखाणे आटोपून झोपली होती. वडील बाहेरच्या खोलीत पोथी लिहीत बसले होते. मी बऊलला विचारले, ''तुझा भाऊ घरी नाही की काय, बऊल?''

आश्चर्यानं माझ्याकडं पाहात ती म्हणाली, ''नाही, कुठंतरी गेले आहेत?''

''कुठं? मी विचारलं.

माझ्या चेहऱ्याकडे खूप निरखून पाहत आणि का कुणास ठाऊक खूप हसत बऊल म्हणाली, ''तिथंच''.

''कुठं? तुझ्या सासरी?''

''माझ्या नाही, तुझ्या''. असं म्हणताना बऊलची हसता हसता पुरेवाट झाली.

नाथभैयासंबंधीचे बोलणे तिथेच थांबले. आम्ही दोघी मग माझ्या नवरदेवाच्या रूप गुणांची चर्चा करण्यात रमून गेलो.

बऊल म्हणाली, '' आई म्हणत होती की, तुझ्या सासरचे लोक फार श्रीमंत आहेत. मोठ्या घरचे लोक आहेत ते. तिथे जाऊन तू राणीच्या थाटात राहशील.'' सासरच्या श्रीमंतीनं माझा उर भरून आला आणि यायलाही पाहिजे. लग्नासारख्या बाबीत संपत्तीपेक्षा आणखीही काही मोठ्या बाबी असू शकतात हे त्यावेळी थोडेसे मला माहीत होते. विचार करू लागले, खरंच नाथभैया किती चांगले आहेत! माझं लग्न इतक्या मोठ्या घरी जुळवून देण्याचा प्रयत्न करीत आहेत. हाय! त्या दिवसापासूनच माझ्या जीवनाच्या लोखंडी बेड्या तयार केल्या जात आहेत, हे तेव्हाच लक्षात आले असते तर.......

सासरच्या या सगळ्या गोष्टी ऐकून माझं मन आनंदातिशयानं उड्या मारीत होतं. थट्टेनं बऊलला म्हणाले, ''आम्हाला काय गरज आहे पैशा अडक्याची. जर मन घेत असेल तर तुच करून घे त्याच्याशी लग्न.''

० ० ०

आजकाल आईला झाले आहे तरी काय कुणास ठाऊक, नेहमी एकाच जागी उदास उदास अशी बसलेली असते. मनातल्या मनात काय विचार करते कुणास ठाऊक. कधी कधी खूप रडतेही. फक्त नाथभैया आल्यावर तेवढी त्यांच्याशी थोडावेळ बोलते, नाहीतर एरवी गप्प. एक दिवस दोघे असेच काही बोलत होती, तर मी लपून त्यांचं बोलणं ऐकलं.

आई म्हणत होती, ''माझा एक शब्दही त्यांनी ऐकला नाही. आता तूच काहीतरी सांग.'' नाथभैयानं अतिशय विश्वासानं विचारलं, ''ऐकणार का नाहीत? आम्ही काही वाईट तर सांगत नाही ना?''

आईनं अतिशय नैराश्यानं म्हटलं, ''तुला काय त्यांचा स्वभाव माहीत नाही? कुठंतरी अडून बसले म्हणजे तिथून त्यांना परमेश्वरही हलवू शकत नाही. वरून हेही सांगतात की, मुहूर्त फार चांगला आहे. सतीचं लग्न तिथंच होईल. खरंच त्यांनी आपलं म्हणणं खरं केलं तर काय होईल. जीवात जीव असेपर्यंत तरी मी सतीला म्हाताऱ्याच्या पदरात बांधणार नाही.''

आता लक्षात आले की, आई सतत उदास का राहते ते. केवळ माझ्यासाठीच. माझ्यामुळेच सर्व लोक चिंतेत आहेत. आणि मी मात्र इतकी निश्चिंत. संध्याकाळ झाली होती. क्षितिजावर दिसणाऱ्या काळ्या ढगांमध्ये बुडणाऱ्या सूर्याची किरणे सर्वदूर स्वर्गापर्यंत पसरलेल्या ताडवनाच्या शेंड्यावर पसरलेली होती. ते ताडवन दुरून जणू मचानच वाटत होते. आणि आताच्या या प्रखर प्रकाशामुळे ते केवळ अवर्णणीय सुंदर दिसत होते. तुळशी वृंदावनावर दुपारची पणती लावूनच मी गुपचूप ओट्यावर येऊन बसले. माझं जीवनासंबंधीचं ज्ञान ते किती? अंगणात दाट पसरलेल्या अंधारात या छोट्याशा ज्योतीचा जसा हरवून जाईल तसा माझ्या जीवनासंबंधीचं ज्ञान जीवनाच्या या अंतहीन प्रवाहात कुठल्याकुठे हरवून गेलं. विवाह करणं म्हणजे नेमकं काय? नवऱ्याबरोबर स्त्रीचे संबंध कसे असतात हे मला तरी कुठं माहित आहे. सगळ्यांना अशाप्रकारे चिंताग्रस्त पाहून मन दमून गेलं. सगळं घर सुनसान आहे, जणू सगळ्यांना एकाच चिंतेनं ग्रासले आहे. वृंदावनाजवळ आताच मी जी पणती लावली होती ती फडफडत गपकन् विझून गेली. आणि अंतर्बाह्य मी अंधाराने व्यापून गेले. मला कोण सांगेल की, आई आणि इतर सारेजण माझ्यासाठी काय म्हणून काळजी करीत आहेत?

खरंच म्हातारा नवरा इतका का वाईट असतो?

○ ○ ○

नाथभैया गप्पा बसणाऱ्यांपैकी थोडीच होते! दुसऱ्याच दिवशी त्यांनी हा संबंध तोडण्यासंबंधी वडिलांना सांगितले. ते म्हणाले, ''नवरा मुलगा म्हातारा आहे. त्यावरही दुसोटा. गावचा जमीनदार तो अशातच झाला आहे. श्रीमंत आहे, पण सतीच्या पायाच्या नखाचीही सर त्याला येणार नाही.'' या प्रकारच्या अनेक गोष्टी सांगितल्या. परंतु वडील पडले जिद्दी. ते हे संबंध तोडण्यासाठी बिल्कूल तयार झाले नाहीत. उलट नाथभैयावरच गरजले. नाथभैया तरी काय कमी आहेत? तेही अत्यंत संतापाने उठून गेले. जाता जाता सांगून गेले की, जीवंत असेपर्यंत या घराचा उंबरठा ओलांडणार नाही.

बिचारी आई, तिनं आता करावं तरी काय? दोघांची जिद्द पाहून गप्प बसली. आता ती सदान्कदा केवळ रडत राहते. ज्याचा अशाच प्रकारच्या उदास वातावरणात माझ्या लग्नाची तिथी जवळ आली. आता फक्त दोन दिवस उरले होते.

आपल्या शक्तीला जे जे झेपेल ते ते वडिलांनी केले होते. माणूसबळ फारसं नव्हतं. ज्या दिवशी लग्नाचं ठरलं त्या दिवसापासून आईनं आंथरून धरलं होतं. अशा अवस्थेत ती काम तरी काय करू शकली असती! नाथभैयांची आई -ताईजी होती म्हणून कुठली कामं अडली नाहीत, नाही तर काहीच झालं नसतं.

o o o

लग्न झालं. मला तर असे वाटले की, जणू मी एखादे स्वप्न पाहिले आणि ते जागेपणीही आठवते आहे. त्यादिवशी सकाळपासून मी केवळ झोपूनच होते. रात्रीचा दुसरा प्रहर असेल, एकाएकी विविध आवाजांनी आणि वाजंत्र्यांच्या संमिश्र आवाजांनी माझी झोप उडाली. आमच्या घराच्या अंगणात लोकांची गर्दी झाली होती. एवढा गदारोळ पण त्यातही परत मी झोपी गेले. त्यानंतर मला केव्हा उठवलं आणि मांडवात नेलं ते काहीच आठवत नाही.

सकाळचा अंधार अजून पूर्णपणे बाजूला सरला नव्हता तर मेघांच्या दुनियेतील नववधूने येऊन आकाशातील निर्माल्य झालेली फुले गोळा केली. आणि सर्वत्र गुलाबी रंग उधळून दिला. झाडांच्या फांद्यांवरून पसरलेल्या थंड हवेची झोप अजून संपलेली नव्हती. ताईजीने मला उठवून न्हाऊ घातले. रात्रीच्या साऱ्या घटना मला स्वप्नासारख्या वाटत होत्या. त्या स्वप्नवत अवस्थेत ओल्या कपड्यात मी खोलीत आले. आत रात्रीप्रमाणे अंधार होता. खिडकीच्या जवळ उभं राहून कपडे बदलताना मी पाहिले की, बाहेर ओट्यावर काही माणसं बसली आहेत. हे सगळेच वऱ्हाडी असतील नाही का! यातील नवरदेव कोणता हे जाणून घेण्याची उत्सुकता निर्माण झाली. मी तिकडेच पाहत राहिले तर बऊल कुठूनतरी धावत धावत आली आणि हसत हसत म्हणाली, ''बऊल! नवरदेव!

लाजेने व्याकूळ झाले होते खरे पण माझ्या तोंडून सहज निघून गेले, ''कोणता?

ओट्यावर बसलेल्या लोकांमधील एकाकडे बोट दाखवून बऊल तिथून परत पळून गेली. तिने निर्देश केला होता तो एक अर्धे वय उलटलेला, तव्यासारखा काळा आणि लठ्ठ माणूस होता. त्यातच सोन्याची साखळी आणि हातात सोन्याचे कडे घातलेला तो माणूस मोठा विचीत्र दिसत होता. त्याला पाहून माझे मन उद्विग्नतेने भरून गेले.

तो आणि माझा नवरा! हे लक्षात आल्यावर मला फार वाईट वाटले. त्याच्याकडे दुसऱ्यांदा पाहायची इच्छापण झाली नाही. धाडकन् खिडकी बंद करून तिथून दूर झाले मी.....

त्याच्या दुसऱ्या दिवशी ते सगळे निघून गेले. मी थोडी निवांत झाले. विवाहाचे हे काही दिवस मी कसे घालविले ते माझे मला माहीत. आईकडे तर या दिवसात पाहवत नव्हते. वडिलांना या वऱ्हाडातून त्या वऱ्हाडात फेऱ्या घालताना पाहत होते पण तेही माझ्याकडे फारसे आले नाहीत. केवळ मला चिडवण्यासाठी बऊल तेवढी अधूनमधून माझ्या खोलीत येत राहिली. तिही अंधाऱ्या खोलीत फार वेळ बसून राहू शकत नव्हती. थोडावेळ थांबून पळून जात असे. सगळ्यात आश्चर्याची गोष्ट म्हणजे या घरात सगळ्यात जास्त व ज्यांनी यायला हवं होतं तेच लग्नाच्या दिवसापासून आमच्याकडे बिल्कूल फिरकले नव्हते. हे तेच नाथभैया होते, जे प्रत्येक गोष्टीत स्वतः होऊन

पुढाकार घेत. खरोखरच हे वडिलांच्या वागण्यामुळे येत नव्हते की काय?

काही दिवसानंतर ताईजी घरी आल्या. आईबरोबर गप्पागोष्टी करताना म्हणाल्या, ''नाथ तर नौकरी करण्यासाठी कटकला निघून गेला.''

आईनं आश्चर्यचकित होऊन विचारलं, ''तो आणि नौकरी करण्यासाठी गेलाय?''

ताईजीनं सांगितलं, ''हां ताई, मागील काही दिवसापासून तो उदास झालेला होता. कदाचित याच नोकरीच्या कारणावरून असेल. मीच त्याला बळजळरीनं रोखून ठेवलं होतं. परंतु त्या दिवशी हट्ट करून निघून गेला. सतीच्या लग्नाआधी दोन दिवस आम्ही त्याला विचारलं तर सांगितलं की, सतीच्या वडिलांबरोबर त्याची काही बाचाबाची झाली होती म्हणे.'' नाथभैयांचे मन इतके व्याकूळ का झाले आहे हे मला माहित आहे. वडिलांच्याबरोबर हजारो वेळा जरी भांडण झाले तरी घर सोडून जाणाऱ्यांपैकी ते नाहीत. फक्त माझ्यासाठीच गेलेत ते. त्या दिवशी मी त्यांना काहीतरी म्हटलं होतं ना, त्यामुळेच ते अतिशय उदास झालेत ते. हिवाळ्यातील मुलायम उन पसरले होते. वेळूवनातील काट्यांच्या गर्दीत लपून एक कबूतर आपल्या स्वप्नांच्या दुनियेतील कुणा अपरिचीत प्रियकरासाठी आर्त गीत गात होते. ओट्यावर बसून ते गीत ऐकता ऐकता मला असं वाटलं की, नाथभैया मला नेहमीसाठी सोडून गेले आहेत. आता ते कधीच परत येणार नाहीत.

○ ○ ○

तेव्हापासून आजपर्यंत दोन वर्षे उलटून गेली. त्या दिवसामध्ये आणि आज किती फरक आहे. असं वाटतं की जणू एक युगच उलटून गेलं आहे. मागील वर्षी पौर्णिमेच्या आधीच शेता-खळ्यात वर्दळ सुरू झाली होती. ते मला आठवलं, हा दोडक्याची फुलं फुलण्याचा महिना तर आहे -ना? घराच्या छपरावर दोडक्याच्या खूप वेली पसरल्यात. संध्याकाळ झाल्या झाल्या अंधार त्यात लपून बसतो. जणू त्याच्या हजारो फुलांच्या डोळ्यामधून तो पाहतो की कोणी आले तर नाही. परंतु संध्याकाळच्या वाऱ्याने मात्र पाहिलेच होते. त्यामुळे एखाद्या खोडकर मुलासारखा धावत येऊन तो वेलींची छेडछाड करी आणि दूर निघून जाई. पौर्णिमेला आता किती दिवस बाकी आहेत -थोडेच तर दिवस राहिले आहेत. अजून घराच्या लिंपण्या सारवण्याची कामं राहिलीत. यावर्षी कुमार पौर्णिमा होणारच नाही असा तर विचार करीत नाही आई? मी ओट्यावर बसून एकटक चंद्राकडे पाहत होते. बाजूच्या दाट आमराईच्या छायेत असणाऱ्या मोठ्या दरीत झाडांच्या गर्दीमधून वस्त्रगाळ होऊन चांदणं साचत होतं. चंद्राला पाहून मला पौर्णिमेची आठवण झाली. अंगणात अंधार आहे. परंतु खोलीतल्या प्रकाशाचा एक पट्टाच्या पट्टा अंगणात पसरला होता. त्याच उजेडात मला बसलेली पाहून आईनं हाक मारली, ''सती.''

मी आईजवळ जाऊन बसले. तिने विचारलं, ''कुठं होतीस इतका वेळ? वडील आले नाहीत का?''

''मला माहीत नाही''. मी उत्तर दिलं. त्यानंतर तिनं काही विचारलं नाही. मूक बसून राहिली. कितीतरी वेळ चंद्राचा एक किरण जणू काही आपल्या निष्काळजीपणामुळेच मचाणावरून निसटून आमच्या अंगणात निपचित पडला होता.

आईचा चेहरा त्या प्रकाशात काहीसा परिचित वाटत होता. कदाचित त्यावेळी ती मनातल्या मनात परमेश्वराचे नाव घेत असेल. मी आतापर्यंत माझ्या मनातलं तिला सांगू शकले नव्हते. सगळं साहस एकवटून म्हणाले, ''आई''?

काही उत्तर आलं नाही.

दुसऱ्यांदा जोरात हाक मारली, ''आई, ए आई''.

यावेळी तिने उत्तर दिलं, ''काय, बोलत का नाहीस?''

''पौर्णिमेला आता काहीच तर दिवस राहिलेत आणि आजपर्यंत तर वृंदावनाजवळ लिंपण - सारवणं झालं नाही, आता कधी होणार?''

''एवढी काय गडबड आहे. पौर्णिमेच्या दिवशीच होईल.'' आई हसली, ''तुझ्या सगळ्या बाबी अशाच आहेत''. ''कुमार पौर्णिमेमुळे बिचाऱ्या सतीची तहानभूकच हरवली आहे.'' बाहेरून कुणीतरी म्हटलं आणि हसलं.

मी चटकन् तिकडे पाहिले. अंगण ओलांडून ते आमच्याकडेच येत होते. अंधारात त्यांची गोरीपान छाती लकाकत होती. आश्चर्याने म्हणाले, ''नाथभैया?''

डोक्यावर पदर घेऊन आई उठून उभी राहिली. म्हणाली, ''सती! चटई आण आतून''.

आईला नमस्कार करून जमिनीवर बसत नाथभैया म्हणाले, राहू दे मावशी, मी बसलोय आता.''

आईनं विचारलं, 'केव्हा आलास कटकहून?''

''आजच.''

''काय सुट्या वगैरे आहेत की काय?''

''सुट्या तर कधीच संपून गेल्या. काही काम असल्याने कटकमधून येता आलं नाही. एकटं एकटं वाटू लागलं, तेव्हा निघून आलो.'' बोलता बोलता त्याचा कंठ दाटून आला. वाटले, कटकमध्ये त्यांचे दिवस काही सुखाचे गेले नाहीत.

''बेटा तुझी तब्येत तर ठीक आहे ना? घरून येतो आहेस, तुझी आई काय करतेय?'' आईनं विचारलं. ''ती तर इथं येणार होती. मी इकडे आल्याने आता ती येणार नाही.'' नाथभैयांनी उत्तर दिले.

केव्हापासून कुणास ठाऊक मी एकटक त्यांच्याकडे पाहत होते. ''जा, पान घेऊन ये.'' म्हणून ढकलत आईनं सांगितलं तेव्हा कुठे माझी समाधी भंगली. डोक्यावरून पदर घेत मी खोलीत गेले. खोलीतही दोघांची बोलणी थोडी थोडी ऐकू येत होती. विशेषतः नाथभैयांचं बोलणं. लहानपणापासून त्यांचं बोलणं ऐकता ऐकता सवयच झाली होती. कटकला जाऊन त्यांना दोन वर्षे तर झालीत. नाही तर आधी ते रोजच आमच्या घरी येत असत. अन् मला जवळ बसवून घेऊन किती गप्पा करीत असत!

तबकातून पान घेऊन मी बाहेर आले. नाथभैयांच्या जवळ जावून तबक ठेवताना पाहिलं की,

नाथभैया माझ्यावरच नजर खिळवून होते. मी अधोमुख अशी खांबाचा आधार घेऊन उभी राहिले. का कुणास ठाऊक दुसऱ्यांदा त्यांच्याजवळ बसताना लाजल्यासारखं होत होतं.

घरामागील अमराईचा अडसर पार करून चांदणं सगळ्या अंगणभर पसरलं होतं. खांबाला टेकून मी नाथ भैयाकडे पाहत होते. त्यांच्या भरदार छातीवर चंद्रप्रकाश अशा प्रकारे पसरला होता की जणू त्यांनी नक्षीची चादरच लपेटून घेतली होती. दोन वर्षांपूर्वी त्यांना पाहिलं होतं. त्यानंतर ते कटकला निघून गेले होते. या अवधीत हे एवढे सुंदर झाले कसे?

बाहेरून वडिलांचा आवाज आला तशी आई उठून तिकडे निघून गेली. नाथभैयाही उठून जाऊ लागले. पण काय विचार करून कुणास ठाऊक ते परत बसले. म्हणाले, ''का ग सती, तिथं का उभी आहेस? इथे का येत नाहीस?'' लाजेनं मी उत्तर देऊ शकले नाही.

''दोन वर्षांपूर्वीची गोष्ट अजून तुला आठवते, अजून राग गेला नाही का?'' त्यांनी विचारलं. आता त्यांच्याजवळ जाऊन बसणं भागच होतं म्हणून त्यांच्याजवळ जाऊन बसले. वाटत होतं की विचारावं -तुम्ही तरी काय कमी आहात?

आवाजात मार्दव आणून ते म्हणाले, ''सती!''

''हं'' लज्जेमुळे कंठ दाटून आला होता. केवळ एवढंच बोलू शकले मी, तेही प्रयत्नानं.

''हे पान कुणाला दिले आहे, मला?'' त्यांनी विचारलं. मी काही बोलू शकले नाही. फक्त तबक तेवढं त्यांच्या आणखी जवळ सरकवलं. त्यावर ते जोरात हसले. म्हणाले, ''तसे वाटत तर आहे. पण मी काही कुत्रा किंवा मांजर तर नाही की दिलं ठेवून की खायला? पान हातात दिलं जातं.''

स्त्री जातीचं एक वैशिष्ट्य असं की जिथं लाज वाटू नये तिथं लाज वाटू लागली की सगळ्या जगाची लाज तिथं एकवटून येते. आणखी कुठली वेळ असती तर त्यांच्या हातात पान दिलं असतं. पण आज काय झालं कुणास ठाऊक मी इतकी लाजून चूर झाले होते की, त्यांच्या हातात पान देऊ शकले नाही मी. नाथभैया थोडे माझ्याजवळ सरकले आणि चिडवू लागले. तरी मी तशीच डोक्यावर पदर घेऊन काष्ठवत बसून राहिले.

आई बाहेरून येऊन खोलीत गेली. नाथभैया उठून उभे राहिले. म्हणाले, ''तर तू मला पान दिलंच नाहीस ना?'' आणि काय वाटून कुणास ठाऊक, तबकातील सारी पानं उचलून त्यांनी दरवाजाबाहेर फेकून दिली.

चंद्र पांढऱ्या ढगातून उलगडत मंद मंद प्रकाशत होता. मी तिथंच दगडासारखी उभी राहून लहानपणीच्या आठवणी आठवू लागले. त्या दिवशीही आपलाच हट्ट त्यांनी पूर्ण केला होता. इतके मोठे झाले आहेत नाथभैया, पण छोट्या छोट्या बाबीत पूर्वीसारखीच नाराजी आणि तसाच अभिमान.

खोलीतून आईने हाक मारली, ''सती! इकडे ये.'' मी चटकन् उठून उभी राहिले.

पौर्णिमेला आणखी एक दिवस अवकाश होता तर मी आणि बऊलने मिळून सारे लिपून - सारवून काढले. वृंदावनाजवळ आम्ही रांगोळी काढू लागलो तर आई तिथं येऊन ओरडली, ''किती वेळ झाला ही पोरगी काम करतेय. काय, तुम्हाला तहानभूक काही आहे की नाही?'' तिला जे करायचं ते करू दे, निदान तू तरी खावून घे'' असं -म्हणत आईनं बऊलला ओढतच नेलं. भूक तर मलाही खूप लागली होती. फक्त मी रागावले होते, म्हणून गेले नाही. एका हातात पणती धरून मी रांगोळी काढत बसले. माझ्या या हट्टीपणामुळे मला आणखी कोणाची तरी आठवण आली. त्या दिवशी त्यांच्या हातात पान न दिल्याने तेही असेच हट्टीपणा करून निघून गेले होते. तेव्हापासून आजपर्यंत -चार दिवस झाले, त्यांनी आमच्या घराच्या सावलीचाही स्पर्श टाळला होता. पूर्वी तर आमच्या घरी आल्याशिवाय ज्यांना जेवणही गोड लागत नव्हते, ते माझ्यावर आज खरोखर इतके नाराज झालेत का?

बऊल जेऊन आली. मी तिला विचारलं, ''आजकाल तुझे भाऊ घरीच असतात ना?''

''हो, का बरं?'' आश्चर्यानं तिनं माझ्या चेहऱ्याकडे पाहिलं.

''मला वाटलं की, कटकला गेले की काय?''

''का, काही विशेष?''

तोंड उघडून बोलायला लाज वाटत होती, पण बोलून गेले,

''असंच, आजकाल आमच्या घरी येत नाहीत ना, म्हणून''.

रांगोळी घालता घालता थांबून बऊल माझ्या चेहऱ्याकडे पाहात राहिली. पुन्हा काम सुरू करताना खाली बघूनच म्हणाली, ''आज यायचं म्हणत होते, परंतु का आले नाहीत कुणास ठाऊक?''

यायचं म्हणत होते? म्हणजे माझ्यावर नाराज नाहीत? मग मनातल्या मनात विचार केला, घरी काम असेल म्हणून आले नसतील. मी असाच काहीही विचार करून इकडे झुरते आहे झालं?

खोलीतून आईनं हाक दिली, ''सती, मी काय अशीच वाट पाहात बसू?'' बऊलने माझ्या हातून रांगोळीचा कुंचलाच ओढून घेतला आणि म्हणाली, ''जा ना, खाऊन घे. मावशी नाराज होते आहे.''

हात धुवून जेवायला बसले. घास तोंडात घातल्याबरोबर आठवण झाली, अरे! मी रागावले होते म्हणून जेवणार नव्हते ना. हे नायभैया मध्ये आले की माझी सगळी कामे फिसकटून जातात.पौर्णिमेच्या दिवशी संध्याकाळचा घंटानाद सुरू होण्याच्या एक प्रहर आधीच बागेतील आडात कुमार पौर्णिमेचा परातीसारखा चंद्र उगवून आला होता. जणू अंधारात उभ्या असणाऱ्या बिना दरवाजाच्या एखाद्या मंदिरात कुणी अखंड ज्योतीच लावून ठेवली आहे. अजून नारळाच्या

शेंड्यांच्या मचानावर त्याचा प्रफुल्ल प्रकाश पसरतच होता तर सारा गाव *हुळहुळीने भरून गेला. हाच तो कुमार पौर्णिमेचा चंद्र आहे, ज्याला पाहाण्यासाठी दोडक्याची फुलं अजून सुकली नव्हती. ताजी टवटवीत होती. चंद्राच्या राज्याची राणी म्हणजे हे दोडक्याचे फूल -चंद्राची नवरी. त्यामुळेच तिच्या पिवळ्या पिवळ्या पाकळ्यांवर चंद्राचा प्रकाश अधिकच उठावदार आणि सुंदर दिसत होता. मला पाहून आई म्हणाली, "धन्य आहेस ग मुली, कानात कापसाचे बोळे घालून खेळतेस की काय? केव्हापासून बोलावता बोलावता माझा गळा फाटून जायची वेळ आली! चल, इकडे ये."

आईच्या मागे मागे आतल्या घरात गेले. तबकात कोणासाठी तरी प्रसाद ठेवून आई म्हणाली, "जा, आपल्या नाथभैयासाठी दोन पानं लावून आण. मी प्रसाद घेऊन जाते."

नाथभैया कधी आले हे तर मला कळलेही नाही? असं बेछूट खेळतांना त्यांनी मला पाहिलं तर नसेल? पण ते घराच्या मागच्या बाजूने कशाला येतील? छे -छे -किती लाजिरवाणी गोष्ट ही?

पान घेऊन बाहेर आले. खावून झाल्यावर नाथभैया हात धूत होते. मला बघून जवळ आले. सगळी लाज बाजूला सारून चटकन् चार पानं त्यांच्या हाताकडे सरकवली. तेही इतके खोडकर की, सगळं पाहूनही न पाहिल्यासारखं करीत होते. मधून मधून हसत होते. खूप प्रयासानं तोंड उघडलं मी, "पान घ्या".

माझा हात थरथरत होता. हात लांबवून त्यांनी पान घेतलं आणि माझ्या हाताला जोरात दाबून म्हणाले, "काल शोधीत होतीस ना मला? निशी सांगत होती".

इतकी दुष्ट, इतकी खोडकर आहे ही बऊल! त्यांना माझ्यासंबंधी काय काय सांगितलं असेल कोण जाणे -अरे -अरे.... लज्जेनं मी इतकी व्याकूळ होऊन गेले की, हे सगळं खोटं आहे, बऊलनं माझ्या नावानं हे सगळं खोटंच सांगितलंय, एवढंसुध्दा बोलू शकले नाही मी.

मला गप्प बसलेलं पाहून ते म्हणाले, "जिच्यासाठी मी इथं येतो, तीच जर अशी लाजू लागली, माझ्याशी बोलतच नसली, तर मी इथं यावं तरी कशासाठी?"

बऊल जवळ येऊन केव्हा उभी राहिली ते माझ्या लक्षातच आलं नाही. नाथभैयानं तिला विचारलं, का ग निशी, येशील ना माझ्याबरोबर, चल.' त्यानंतर थोडं पुढं जाऊन ते मागे आले आणि म्हणाले, 'ठीक आहे, आज इथं राहा आपल्या बऊलबरोबर. सकाळी उठून ये.' फुलांवर मी नेहमीच प्रेम करते. त्यासाठीच घराच्या मागील वाफ्यामध्ये बरीच फुलझाडं लावली आहेत. एके दिवशी संध्याकाळी एकाएकी आठवलं की, आमच्या बागेत आता रंगणीची (सदाबहार) फुलं फुलून आली असतील. मागे जाऊन पाहिलं तर बऊल कधी कोणास ठाऊक आधीच तिथं आली होती आणि तिने परडीभर फुले जमवून ठेवली होती. मला बघून तिनं हाक दिली. 'ये. तोडू.'

---

* हुळहुळी : हर्षध्वनी. प्रत्येक शुभ आणि आनंदाच्या क्षणी ओरिसातील स्त्रिया मुखाने एक विशिष्ट असा आवाज काढतात. त्याला हुळहुळी करणे असे म्हणतात.

मी म्हणाले, 'पुरे झाली गं. काय करायचं इतक्या फुलांचं? काय करायचं इतक्यांचं!' बऊलने हसत माझ्याकडे पाहिलं. म्हणाली, 'जर तुला एवढंच कळलं असतं, तर तू संध्याकाळच्या वेळी शांतपणे घरात बसली असतीस'. 'अग चल. तुला तर प्रत्येक गोष्टीत थट्टाच सुचते. चल ये.'

आम्ही दोघी येऊन व्हरांड्यात बसलो. बऊलही किती दुष्ट आहे. सगळीच्या सगळी फुलं माझ्या डोक्यावर उधळून खिः खिः करून हसू लागली. कोमल पाकळ्यांच्या स्पर्शाने साऱ्या हृदयात कंप पसरत गेला.

मी विचारलं, 'हे काय आहे?'

'सुहाग शैया.' असं उत्तर देताना बऊलची हसता हसता पुरेवाट झाली.

'कुणाबरोबर काय? थांब, मला आठवत नाही, तुझ्या नवऱ्याचं नाव काय गं, सांग तरी खरी?'

खूप दिवसांपासून मिळत आलेल्या जखमेवर घाव बसावा तसे झाले मला. या बाबीची आठवण होताच हृदयात येऊन हृदयातून काहीतरी निखळून पडले असेच वाटले. परंतु शब्दातून मला एवढेच व्यक्त करता आले'. 'तुला प्रत्येक वेळी थट्टाच सुचते.'

बऊल म्हणाली, 'नाही नाही बरं, खरं तेच सांगते आहे मी. थट्टा कशाला करीन मी? तुझ्या सासरच्यांनी मूळ पाठवलंय म्हणे. मावशी म्हणत होती.... हे काय? तुझा चेहरा असा का झाला बऊल?' बुडत्या माणसाला वाचवण्याचा शेवटचा उपायही जेव्हा निष्फळ होतो तेव्हा जसे वाटते, जवळजवळ तसेच वाटले मला. त्या क्षणभरात माझी अवस्था कशी झाली होती ते नेमके मला कळू शकले नाही!

'बऊल!' बऊलने हाक मारली.

आपल्या छातीवर माझं डोकं घेऊन ती म्हणाली, 'हे काय झालं होतं बऊल तुला? सांग ना, तुला माझी शपथ आहे.'

मी म्हटलं, काही नाही, थोडी चक्कर आल्यासारखी झाली.'

'का आपल्या नवऱ्याची गोष्ट ऐकून?'

मला आठवतेय की, मला त्या वेळीही तिच्या त्या बोलण्याचं हसू आलं. मी म्हटलं, 'आणखी काय, चल जा.' बोलणी तिथेच संपली. एखादी हिरवी नदी वहावी तशी शेतं पसरली होती. पण त्यावरली हिरवळ मात्र संध्याकाळच्या वेळी अंधारात बुडणाऱ्या उदास ढगांप्रमाणे वाटत होती. दुपारच्या वेळी कधी तरी रंगीत सतरंजी अंथरून वारा झोपी गेला होता. संध्याकाळ होताच त्याने जेव्हा डोळे उघडले तेव्हा त्याच्या लक्षात आले की, आपली सतरंजीच कुणीतरी चोरली आहे. आणि त्यासाठीच तो साळीच्या शेतामधून तिचा शोध घेत फिरत होता. आम्ही दोघीही वेड्यासारख्या त्याच्याकडे पाहत चुपचाप बसून होतो. बऊल जायला निघाली. म्हणाली, 'संध्याकाळ झालीय, आता मी चलते बऊल!' तुझ्यातच हरवलेली मी म्हणाले, 'बरं.'

ती निघून गेली. मी एकटीच दगडासारखी तिथे बसून राहिले. भावनांच्या अथांग सागरात पाय सोडून. थंडीच्या दिवसातील जोराचा वारा गोठ्याच्या छपरावर पसरलेला सारा धूर एकत्र करून एका कन्हेरीच्या लांब फांदीभोवती पसरवीत होती. जणू तो त्या फांदीला शुभ्र पगडीत बांधतो आहे असे वाटत होते. गवताच्या आत कुठेतरी लपलेला रातकिडा संध्याकाळच्या शांततेला करवतीसारखं कापीत होता -कर् कर् कर्.

आईनं येऊन उठवलं तेव्हा, किती रात्र झाली होती कुणास ठाऊक. गुपचूप आतल्या घरात जाऊन मी लवंडले. परंतु या दुर्दैवी डोळ्यात झोप येती तर कोणते दु:ख होते? त्या अंधारात साऱ्या चिंतांनी एकत्र येऊन मला घेरलं. बऊलने येऊन आज जे सांगितले, ते कदाचित् खरेच असेल. त्या शिवाय का त्या दिवशी वडील आईशी मुकुंदपूरची चर्चा करीत होते? फार पूर्वी म्हणजे लग्नाच्या वेळीच आपण आपल्या नवऱ्याला पाहिलं होतं. एकदाच पाहूनही माझ्या मनावर जी छाप उमटली त्यामुळे आज अंधारातही त्या रूपाचे स्मरण होताच मला सगळीकडे अंधार पसरलेला दिसतोय, आणि त्यांच्याबरोबर तर मला नेहमीसाठी संसार करायचा आहे. जगातले सगळे मोह मला टाळावे लागतील, केवळ त्या रूपाकडे पाहून? परंतु या सगळ्या अनर्थासाठी दोषी कोण आहे? तेच नाथ भैया. माझ्या विवाहानंतर इतके दिवस कटकला राहिले, आणखी एक वर्ष नसते का राहू शकले? इतके दिवस न पाहिल्याने त्यांना विसरल्यासारखं झालं होतं. मग देवतेचं रूप घेऊन का म्हणून ते या अपूज्य मंदिराच्या दरवाजावर मला दर्शन द्यायला आले आहेत? त्यांचं रूप, स्नेह, त्यांच्या अश्रूंनी मला सारं काही विसरायला लावलं. करू तरी काय शकते मी? माझ्याजवळ त्यांना शरण जाण्याशिवाय दुसरा उपाय तरी कोणता होता?

आई येऊन म्हणाली, 'सती, ये, खाऊन घे.'

मी म्हणाले, 'मी काही खाणार नाही आई, मला भूक नाही.'

'ये थोडंसं खा. माझी चांगली मुलगी ना तू!'

दु:ख आणि आघातांनी शून्यवत झालेल्या माझ्या मस्तकावर या एकाच कोमल वाक्याचा परिणाम झाला आणि दोन्ही डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागले. इतका अंधार होता तरी कसे कुणास ठाऊक आईच्या लक्षात आले की, मी रडत होते. ती जवळ आली, पाठीवरून हात फिरवीत तिनं विचारलं, 'कुठं दुखतय का मुली?'

मी म्हटलं, 'डोकं फार दुखतंय.'

जेवण बाजूलाच राहिलं, ती जवळ येऊन पंखा ढाळू लागली. त्यातच मला कधी झोप लागली कळलं नाही.

दुसऱ्याच दिवशीची गोष्ट. खोलीत बसून मी सुपारी कात्रतच होते. तेव्हा बऊलची आई सहज म्हणून आमच्या घरी आली. फार दिवसांच्या आजारानंतर त्या दिवशी थोड्या वेळासाठी आई व्हरांड्यात येऊन बसली होती. ताईजींनी विचारलं, 'काय ताई, काय चाललंय?' 'काय व्हायचंय? ये ना.' आईनं म्हटलं, 'आज कशी काय वाट चुकलीस?'

घटकाभराचा वेळ गेला. कोणीही आलं नाही खोलीमध्ये, विचार केला किती का कुरूप असेनात हे - शेवटी मी पत्नी तर त्यांचीच आहे ना! यांच्याशिवाय आता मला दुसरा आश्रय तरी कुठं आहे? मला पसंत नाहीत असं म्हटल्यानं जग थोडंच माझं दुःख ऐकून घेणार आहे! उलट लोक अधिकच हसतील. यांच्याबद्दल मी प्रेमभावना बाळगूच शकणार नाही का? पाहते, प्रयत्न करून पाहते. मन घट्ट करून त्यांच्याबद्दलच्या सगळ्या भावना सहन केल्या पाहिजेत सगळा जीव एकवटून त्यांच्याबद्दलच्या सगळ्या अप्रितीच्या भावना बाजूला तर सारल्या पाहिजेत! नाही नाही, त्यांच्याबद्दलची प्रेमभावना जागविण्याचा प्रयत्न मी करीन, जरूर जरूर करीन. दिवसभराचा थकवा आणि ग्लानी यामुळं डोळ्यात झोप दाटून आली. बसून राहणं शक्य झालं नाही. तसाच बसल्याबसल्या डोळा लागला. मला झोपेनं कधी घेरलं ते कळलंसुध्दा नाही. कुणाचा तरी थंडगार हात लागला. तशी मी दचकून जागी झाले. घाईघाईनं उठून बसले आणि पदर समोर ओढून घेतला. छातीतली धडधड वाढली होती. त्या मंद प्रकाशात बुरखा -पदर घेताना ओळखलं होतं की, हे माझे पती आहेत.

दिवा अधिकच मंद करीत ते म्हणाले, 'चल पलंगावर'.

मी काही बोलले नाही. ते माझ्याजवळ आले. दोन्ही हातांनी मला धरून अंथरूणापर्यंत आणलं. म्हणाले, 'चल'.

तरीही मला पलंगाजवळच उभी पाहून ते पलंगावरून उतरले आणि पदर बाजूला सारीत हसत हसत म्हणाले, 'इतकं काय लाजायचं? मला नाही आवडत असलं काही'.

त्यांना हसताना पाहायची मला वाटतं ही पहिलीच वेळ होती माझी. वाटलं, पाहिलं नसतं तर बरं झालं असतं. परमेश्वरा! माणसाचं हसणं आणि इतकं भयानक याचा तर मी कधी विचारही केला नव्हता. हसू असंही असू शकतं हे मला कधी स्वप्नातही वाटलं नव्हतं.

मला शांतपणे उभं राहिलेलं पाहून ते आणखी जवळ आले. माझे दोन्ही हात आपल्या दोन्ही हातांनी धरून त्यांनी मला पलंगावर ओढलं. तशी मी त्यांच्या हाताला झटका दिला. त्यामुळे मी मागच्या बाजूला कलंडले. तसं त्यांनी माझ्या हाताला गच्च धरलं आणि म्हणाले, 'हे काय चालवलंय? मी काय खातोय तुला?'

o o o

विजेच्या वेगाने मी त्यांना ढकललं आणि पलंगावरून खाली उतरले. शिः काय माणूस आहे हा!

सारं शरीर संतापानं आणि घृणेनं पेटून थरथरत होतं. माझं हे असलं वागणं पाहून त्यांना कमालीचा संताप आला. दोन्ही हातांनी लहान मुलाला उचलावं तसं त्यांनी मला उचललं आणि पलंगावर बसवलं. म्हणाले, झोप इथं. पलंगावर दगडासारखी बसून राहिले मी. इतका अभद्र माणूस आहे हा? लग्न केलं म्हणून काय अशा प्रकारच्या बलात्कारानं हे माझं मन थोडंच जिंकू शकणार होते? अरे अरे, थोड्याच वेळापूर्वी तर मी त्यांच्यावर प्रेम केलं पाहिजे असा विचार करीत होते.

अंथरूणावर माझ्याकडे पाठ फिरवून ते झोपले होते. वाटलं झोपले असतील मग त्या अंथरूणावर त्यांच्याजवळ झोपण्याची इच्छाच होईना. जमिनीवर झोपण्याच्या विचारानं मी उठले तशी त्यांनी माझ्या साडीचा पदर पकडला आणि विचारलं, 'कुठं जातेस? वाटलं की अन् चटकन मी उठून बसले. मी पाहिलं, बऊल माझा हात धरून ओढत होती. म्हणत होती, 'अरे परमेश्वरा. संध्याकाळ झाली न झाली की झोपी गेलीस का?'

मी म्हणाले, 'बऊल, तू कधी आलीस?'

'थोडा वेळ झाला. इथं बसून तुलाच उठवीत आहे. चल, चलायचे नाही का?' तोंड धुवून मी बाहेर आले, म्हणाले, 'चल, जाऊ.'

'आईला सांगून आलीस ना?'

'हो'.

मैदानापलीकडील साळीच्या फुलांच्या सुगंधाने त्या दिवशी हवेलाही नशा आला होता. त्या नशेमुळेच की काय तो आकाशातल्या ढगांमध्ये घुसून त्यांना उपद्रव देत होता. त्याच्या या मनमानी वागण्यामुळे घाबरून ढग इकडे तिकडे पळत होते. नाथभैय्याच्या घरी पोचेपर्यंत तर पावसाला जोरात सुरूवात झालीही. गावातील काही लोक बाहेरच्या ओट्यावर बसून गप्पाटप्पा करीत होते. त्यात नाथभैय्याही होते असे वाटते. बऊलने मला सरळ आत नेले. स्वयंपाकघरात बसलेली ताई स्वयंपाकात मग्न होती. मला पाहून म्हणाली,

'तुझे वडील आले का?'

म्हणाले, 'नाही'.

''आई काम करीत होती?''

''बसली होती.''

तिथं खूपसं पीठ मळून ठेवलं होत. आम्ही दोघी बसून गोड पुऱ्या लाटू लागलो. ब्लऊलचे मन एका ठिकाणी थोडेच गुंतून राहते? ती थोड्या थोड्या वेळाने बाहेर चक्कर मारून येत असे. माझ्यापेक्षा चार वर्षांनी लहान होती ती, पण तिच्या वयात एवढ्या ओळखी नव्हत्या माझ्या. पुऱ्या लाटण्याचं काम जवळजवळ संपत आलं होतं. ताई तिकडे पाहात नेतच्या आईस - काकूस म्हणाली, ''पाहिलस, क्षणभरात किती पुऱ्या लाटल्यात या पोरीनं. याला म्हणतात, काम करणं. नाही तर आमची निशा बघ, तिकडे जाऊन घोड्यासारखी नाचते आहे.' नंतर माझ्याकडे पाहात म्हणाली, 'थांबव मुली आता, राहु दे. चुलीपुढे बसून घामाचे ओघळ लागलेत बघ वहायला. जा, थोडा वेळ थंड हवेत हिंडून ये. जा ना, तुला माझी शपथ आहे'.

-ताईच्या घरी खाण्यापिण्यात खूप रात्र उलटून गेली. बऊल म्हणाली, 'आई म्हणते -बऊल, .... खूप रात्र झाली, इथंच झोपी जा.'

तिथं राहण्याचा खूप मोह होत होता. उद्या सकाळी उठल्याबरोबर आणखी एकवेळ नाथभैय्याला पाहता येईल. परंतु जबरदस्तीने ती इच्छा मारून टाकत म्हणाले, 'नाही गं बऊल, तिकडे आई वाट पाहात असेल.

घरी पोचण्यापूर्वीच पावसानं जोर धरला होता. व्हरांड्यातच मला पाहून, आई म्हणाली, 'पावसात भिजलीस ना सगळी? जा, कपडे बदलून झोपी जा.

आई गेल्यावर मी हळूहळू खोलीत गेले. आणि दरवाजा आतून बंद करून ओल्या कपड्यातच झोपी गेले. नाथ भैय्याच्या स्पर्शामुळे ते कपडे सुगंधित झाले होते ना. असं वाटलं की आज आपली पहिली रात्र आहे.

... आणखी चार दिवसानंतर माझी सासरी जाण्याची तयारी जोरात सुरू झाली, तेव्हा भीतीने आणि चिंतेने अर्धमेली होऊन मी अंथरूनच धरले. माझे मन जाणून या संकटातून सोडवणारं असं आता कोण आहे माझं? बकरीच्या निराधार पिलाला बळी द्यायला नेताना त्याच्या करूण डोळ्यातील विनंती कोण ऐकणार? माणसाच्या जन्माला येऊनसुध्दा माझी अवस्था त्यापेक्षा वाईट होती.

लहानपणापासून परिचित असलेले ठिकाण सोडून आज मला नेहमीसाठी जावे लागणार होते. त्या अपरिचित लोकांमध्ये ज्या दिवसापासून माझ्या पाठवण्यासंबंधीची बोलणी सुरू झाली त्या दिवसापासून आईच्या डोळ्यांचे पाणी खंडले नव्हते. त्या दिवशी तर तिचं रडणं कोणत्याही प्रकारे थांबलं नाही. सकाळपासून ते संध्याकाळपर्यंत मला पकडून -बिलगून ती रडत होती. मीही तिच्याबरोबर रडत होते. रडता रडता मी कधी बेशुध्द पडले कळलेच नाही. मी शुध्दीवर आले तेव्हा दिसले की, ताईने मला नेऊन मेण्यात बसविले होते. मेण्याच्या दरवाजाच्या फटीतून नाथभैय्याचे शरीर दिसत होते. मी त्यांच्या धोतराचा पाल गच्च पडकून रडू लागले. नाथ भैय्यांनी आतापर्यंत आपलं रडणं अवरून धरलं होतं, पण आता आवरणं शक्य झालं नाही. मला समजावत मेण्याबरोबर खूप दूरपर्यंत आले. नंतर ते परत फिरले. रस्त्याच्या दोन्ही बाजूला मी बालपणापासून पाहिलेली झाडं -पानं होती. ज्यांच्या सावलीत बसून नाथ भैय्याबरोबर मी कित्येक दुपारी घालविल्या होत्या. एक एक करून ती माझा निरोप घेऊन मागे जाऊ लागली. गावाबाहेरचे ते ताडवन, त्याच्या किनाऱ्याची वेळूवने, त्यांच्या तुरळक छायांमधून दिसणारा तो काळा कातळ, ज्यावर मी अंघोळीच्या वेळी पाय घासत असे -त्या साऱ्यांनी मेण्याच्या फटीतून मला एक एक वेळ निरखलं. आता मी त्यांना पाहू शकणार नाही, माझे डोळे अश्रूंनी भरून गेले. तक्क्यात तोंड खुपसून मेल्यासारखी मी पडून राहिले.

गावापासून थोड्या दूर अंतरावर अष्टमीचा चंद्र नारळाच्या झावळ्यांच्या पालखीत बसून सासरी जात होता. रस्त्याच्या दुतर्फा झाडांच्या सावल्यांच्या अनेक प्रकारच्या नक्षीदार रांगोळ्या पसरत निघाल्या होत्या.

सारी रात्र रस्त्यातच गेली. दुसऱ्या दिवशी सकाळी काही बायकांनी मला नेऊन होमहवनाच्या ठिकाणी बसविले. लोकांची गर्दी आणि उष्मा यामुळं असं वाटलं की, आपला श्वासच थांबला आहे, इकडची स्वारी मला अगदी खेटून बसली होती. एकाच चटाईवर तर बसलो होतो आम्ही. अशा अवस्थेतही त्यांचा चेहरा पाहण्याची प्रबळ आस मला लागून राहिली होती. बुरख्याच्या आतून अतिशय परिश्रमानं थोडा चेहरा वर करून त्यांना पाहून घेतलं.

हे परमेश्वरा! त्यांचं रूप पाहिलं नसतं तर अधिक चांगलं झालं असतं. जळालेल्या लाकडासारखा रंग आणि त्यावर देवीचे व्रण, त्यामुळे जणू त्यांचा चेहरा शिवला गेला होता. ज्यात तिळभरही लावण्य नाही, असे हे रूप पाहात पाहातच मला जगातलं सगळं सौंदर्य विसरलं पाहिजे. तारुण्यातल्या सगळ्या इच्छा इथं पुऱ्या होणार नाहीत. डोळ्यापुढं अंधार दाटून येऊ लागला. खाली मान घालून कशी तरी बसून राहिले.

विधी संपल्यावर कुणीतरी, कदाचित घरातील मोलकरीण असेल ती, तिनं मला आतल्या खोलीत नेऊन बसविलं. त्यानंतर एक एक करून खूप स्त्रिया तिथं आल्या. मला पाहायला. थोड्याच वेळात तिथं इतकी गर्दी जमली की तीळ ठेवायलाही जागा उरली नाही.

सुनमुख पाहण्याचा कार्यक्रम संपला. सर्वजणी माझ्या चेहऱ्याबद्दल आपापलं मत प्रकट करीत बाहेर गेल्या. पण दोनचार मुली मात्र तिथे राहिल्या. त्या गेल्याच नाहीत. माझ्याच वयाच्या असतील त्या. मी काही तरी बोलावं म्हणून त्या कुत्र्याच्या अंगावरील माशांसारख्या धडपडत होत्या. दैवच बलवत्तर म्हणून की काय एक म्हातारी त्या खोलीत आली. ती गर्दी पाहून ती संतापलीच. म्हणाली, 'बिचारीनं काल सकाळपासून काही खाल्लं पिल्लं नाही. किती अशक्त झालीय ती आणि तुम्ही काय तिला त्रास देताय्. जा, तिला थोडं झोपू द्या.

त्या आपापसात एकमेकींकडे पाहात हसू लागल्या. मग एक एक करून निघून गेल्या. मला झोपायला सांगून आणि त्या खोलीचा दरवाजा बंद करून ती म्हातारी निघून गेली.

मला कशी झोप येईल बरं! एकांतामुळे पुन्हा इकडच्यांची आठवण झाली. त्यांची येण्याची वेळ झाली होती. देवाब्राम्हणांच्या साक्षीनं मी त्यांची पत्नी झाले होते ना. मी त्यांची दुसरी बायको. पहिली बायको एक वर्षाचा मुलगा मागे ठेऊन देवाघरी गेली होती. त्या दिवसापासून आजपर्यंत जणू ते माझीच वाट पाहात होते! आणि मला यांच्याबरोबर नेहमीसाठी एकरूप होऊन संसार करावा लागणार होता! याच चेहऱ्याकडे पाहून बालपणीचे सारे सारे मोह बाजूला ठेवावे लागतील ना? त्याच वेळी मला आठवला तो सौंदर्यसिंधूने न्हाऊन निघालेला एक परिचित चेहरा ज्याच्या शरीरावर सृष्टीकर्त्यानं सगळं सौंदर्य उधळलेलं होतं.

तो चेहरा आणि माझ्या मालकाचा चेहरा! किती फरक, किती अंतर आहे या दोन्हीमध्ये! तुलना करतांनाही लाज वाटते. तरीही ते मला आप्राप्य नव्हते. परंतु..... पुढे विचार करू शकले नाही. वाटले, अशाच प्रकारे जर मी विचार करीत राहिले तर वेडी होऊन जाईन. तरीही या चिंतेमध्ये वेड लागणे किती सुखकर आहे याचा विचार करू लागले!

सूर्य अस्ताला जाऊन बराच वेळ झाला होता. क्रमाने दिवसाचा उजेड संपत चालला होता. ज्या खोलीत मी बसले होते त्या खोलीला खिडकीही नव्हती. त्या अंधाऱ्या खोलीत गुपचूप खूप उशीरपर्यंत बसून राहिले. बाहेर, कुठे तरी दूरवर पूजेच्या घंटा वाजू लागल्या. घराघरातून दिवे लागले. काही वेळानंतर दोनचार स्त्रिया आल्या आणि त्यांनी मला दुसऱ्या एका खोलीत नेलं. इथंही तसाच अंधार आहे. फक्त खोलीच्या एका कोपऱ्यात एक दिवा मिणमिणतो आहे. खोलीत एका बाजूला एक मोठा पलंग आहे व त्यावर अंथरूण घातलेलं आहे असं त्या अंधुक प्रकाशातही दिसत होतं. त्यांनी मला नेऊन खोलीतल्या एका कोपऱ्यातल्या चटईवर बसवलं. आणि त्या निघून गेल्या. मला या खोलीत का आणण्यात आलं ते माझ्या लक्षात आलं. वीज चमकल्यानंतर ज्याप्रमाणे प्रचंड गडगडाट होणार याचा अंदाज लोक लावतात तसेच काहीसे झाले माझे. एका अनामिक भीतीने माझे शरीर थरथर कापू लागले. हृदयातील ठोके वाढले. वाटलं, इतकी मी का घाबरते आहे बरं? हे वाघ किंवा साप तर नाहीत ना की जे मला खाऊन टाकतील किंवा दंश करतील? काय म्हणून घाबरायचं?

काभराचा वेळ गेला. कोणीही आलं नाही खोलीमध्ये, विचार केला किती का कुरूप असेनात हे - शेवटी मी पत्नी तर त्यांचीच आहे ना! यांच्याशिवाय आता मला दुसरा आश्रय तरी कुठं आहे? मला पसंत नाहीत असं म्हटल्यानं जग थोडंच माझं दुःख ऐकून घेणार आहे! उलट लोक अधिकच हसतील. यांच्याबद्दल मी प्रेमभावना बाळगूच शकणार नाही का? पाहते, प्रयत्न करून पाहते. मन घट्ट करून त्यांच्याबद्दलच्या सगळ्या भावना सहन केल्या पाहिजेत सगळा जीव एकवटून त्यांच्याबद्दलच्या सगळ्या अप्रितीच्या भावना बाजूला तर सारल्या पाहिजेत! नाही नाही, त्यांच्याबद्दलची प्रेमभावना जागविण्याचा प्रयत्न मी करीन, जरूर जरूर करीन. दिवसभराचा थकवा आणि ग्लानी यामुळं डोळ्यात झोप दाटून आली. बसून राहणं शक्य झालं नाही. तसाच बसल्याबसल्या डोळा लागला. मला झोपेनं कधी घेरलं ते कळलंसुध्दा नाही. कुणाचा तरी थंडगार हात लागला. तशी मी दचकून जागी झाले. घाईघाईनं उठून बसले आणि पदर समोर ओढून घेतला. छातीतली धडधड वाढली होती. त्या मंद प्रकाशात बुरखा -पदर घेताना ओळखलं होतं की, हे माझे पती आहेत.

दिवा अधिकच मंद करीत ते म्हणाले, 'चल पलंगावर'.

मी काही बोलले नाही. ते माझ्याजवळ आले. दोन्ही हातांनी मला धरून अंथरूणापर्यंत आणलं. म्हणाले, 'चल'.

तरीही मला पलंगाजवळच उभी पाहून ते पलंगावरून उतरले आणि पदर बाजूला सारीत हसत हसत म्हणाले, 'इतकं काय लाजायचं? मला नाही आवडत असलं काही'.

त्यांना हसताना पाहायची मला वाटतं ही पहिलीच वेळ होती माझी. वाटलं, पाहिलं नसतं तर बरं झालं असतं. परमेश्वरा! माणसाचं हसणं आणि इतकं भयानक याचा तर मी कधी विचारही केला नव्हता. हसू असंही असू शकतं हे मला कधी स्वप्नातही वाटलं नव्हतं.

मला शांतपणे उभं राहिलेलं पाहून ते आणखी जवळ आले. माझे दोन्ही हात आपल्या दोन्ही हातांनी धरून त्यांनी मला पलंगावर ओढलं. तशी मी त्यांच्या हाताला झटका दिला. त्यामुळे मी मागच्या बाजूला कलंडले. तसं त्यांनी माझ्या हाताला गच्च धरलं आणि म्हणाले, 'हे काय चालवलंय? मी काय खातोय तुला?'

o o o

विजेच्या वेगाने मी त्यांना ढकललं आणि पलंगावरून खाली उतरले. शिः काय माणूस आहे हा!

सारं शरीर संतापानं आणि घृणेनं पेटून थरथरत होतं. माझं हे असलं वागणं पाहून त्यांना कमालीचा संताप आला. दोन्ही हातांनी लहान मुलाला उचलावं तसं त्यांनी मला उचललं आणि पलंगावर बसवलं. म्हणाले, झोप इथं.

पलंगावर दगडासारखी बसून राहिले मी. इतका अभद्र माणूस आहे हा? लग्न केलं म्हणून काय अशा प्रकारच्या बलात्कारानं हे माझं मन थोडंच जिंकू शकणार होते? अरे अरे, थोड्याच वेळापूर्वी तर मी त्यांच्यावर प्रेम केलं पाहिजे असा विचार करीत होते.

अंथरूणावर माझ्याकडे पाठ फिरवून ते झोपले होते. वाटलं झोपले असतील मग त्या अंथरूणावर त्यांच्याजवळ झोपण्याची इच्छाच होईना. जमिनीवर झोपण्याच्या विचारानं मी उठले तशी त्यांनी माझ्या साडीचा पदर पकडला आणि विचारलं, 'कुठं जातेस? वाटलं की मोठ्यानं ओरडून सांगावं, 'यमराजाकडं जातेय'. पण मी काही बोलले नाही. मी बोलत नाही असं पाहून ते कमालीचे चिडले. म्हणाले, 'तुझं असंच वागणं असेल तर लक्षात ठेव, परिणाम फार वाईट होतील. मी सांगतो ते ऐक. माझ्याजवळ ये'.

परत तीच ओढाताण. बाईमाणूस मी. माझ्यात ताकत तरी किती असणार! मी अगदी थकून गेले. दोन्ही हातांनी कवटाळून त्यांनी मला आपल्या छातीजवळ ओढलं आणि आपले तोंड माझ्या तोंडाजवळ आणले. कदाचित् परत एकदा त्यांना माझा मुका घ्यायचा आहे...

ठरवून टाकलं की, आता त्यांना आडवायचं नाही. त्यांना जे करायचय् ते करू दे. परंतू घृणेनं माझं मन इतकं तुडूंब भरलं होतं की, माझ्याही नकळत त्यांना मागं ढकलून पलंगावरून मी खाली उडी मारली. मला पकडण्यासाठी ते माझ्या मागेच येत आहेत हे पाहिल्याबरोबर मी दिवा विझवून टाकला.

मी कुठे आहे ते काही त्यांना अंधारात दिसू शकले नाही. त्या अंधारात मला शोधता शोधता त्यांच डोकं पलंगावर खूप जोरानं आदळलं ते मी ऐकलं. वेदनेनं कळवळत ते म्हणले, 'ठीक आहे, उद्या सकाळी तुझा आणि माझा हिशेब पूर्ण होईल. अजून तू मला ओळखू शकली नाहीस ना?'

खूप शोधाशोध करून ते पलंगावर जाऊन झोपले. अंधारात तर काही दिसत नव्हते. पण पलंगाच्या करकरण्यामुळे ते लक्षात आले.

घटकाभराचा वेळ गेला. काही घडले नाही.

मी मात्र दरवाजाजवळ अर्धमेली होऊन काष्ठवत उभी होते. वाटत होते की थोडीजरी हलले तरी 'ते मला परत पकडण्यासाठी येतील!

त्यांच्या घोरण्याचा आवाज कधी सुरू झाला हे कळलंच नाही. मग मी हलकेच दार उघडले आणि पाय न वाजवता बाहेर आली.

पहाट होत आली होती. जणू दूर समुद्राच्या वक्षावरील अंधाराचा पडदा विरळ होत होता. झुंजुमुंजू वातावरणात कुठे कुठे उभे असणारे वृक्ष दिसू लागले होते. परमेश्वराच्या या अफाट सृष्टीसाम्राज्याखाली मी उभी होते आणि माझे डोळे वाहत होते. जणू माझ्या आत दाटलेलं सगळं त्याला सांगायचं होतं. त्यासाठीच तर उर फुटून दोन्ही डोळ्यातून पाणी वाहू लागलेले होते. वाटले, काय पती असा असतो? यांच्यावर मी प्रेम करू शकेन का?

त्या दिवशी सकाळी शेतीवाडीच्या कामानिमित्ताने बाहेर जाण्यासाठी इकडची स्वारी तयार होत होती. सहज कानावर आलं की, ते आज परत येणार नाहीत. वाटलं, काहीही असो, आजतरी सुट्टी मिळाली!

सकाळपासून घरातली ती मोलकरीण त्यांच्या जाण्याची तयारी करीत होती. वाटलं, यांच्या घरात कोणी आणखी नाही का? ऐकलं होतं की सासूबाई आहेत -विधवा आहेत. परंतु हिचं शरीर तर दागदागिन्यांनी शृंगारलेलं आहे. वयही काही अधिक नाही!

मग ही आहे तरी कोण?

मला दाराजवळ उभी राहिलेली पाहून ती माझ्याजवळ आली. एखाद्या कळवांतणीसारखी माझ्यासमोर हात नाचवत म्हणाली, "ओ सूनबाई! इकडं आई किती वेळापासून अंघोळ करून ओल्या कपड्यात उभी आहे, दिसत नाही का तुला?'

जिवाचा संताप संताप झाला तिचे ते शब्द ऐकून. काय यांच्या घरात सगळीच माणसं क्रमानं अभद्रच आहेत? मी म्हटलं, 'मला माहित नाही!' अंघोळीनंतरचे कपडे देणे किंवा पूजेची तयारी करून देणे या बाबी काय कोणी शिकवित असतं का हो! काही छोटी पोरगी नाहीस तू आता? चल, बाहेर हो!

ती निघून गेली. दोनच तर दिवस झाले आहेत मला इथे येऊन. नाही तर काय केलं असतं - बाहेर निघाले. एक दरवाजा ओलांडून पलिकडे देवघर आहे. तिथे ओल्या कपड्यात एक म्हातारी उभी होती. वयाच्या कुठल्याही छटा तिच्या शरीरावर उमटल्या नव्हत्या. गोऱ्या रंगाची आणि सडपातळ अशी ती होती. बुध्दिमत्ता आणि करारीपणा तिच्या चेहऱ्यावर दिसत होता. ही माझी सासू होती.

आतल्या खोलीतून कपडे त्यांना आणून दिले. त्यावेळी ती मोलकरीण दरवाजाच्या मध्यभागी उभी राहून स्वतः सगळ्यांना ऐकू जाईल, अशा पध्दतीने सांगत होती, 'मला शिवायचं नाही, नाहीतर दुसऱ्यांची इतकी खुशामत करायची जरूरी तरी काय होती. बघता बघता सगळ्या बाबींची

तयारी करून टाकली असती!'

सासूबाईंनी कपडे बदलले. म्हणाल्या, 'पाहतेस ना, घर किती एकटं एकटं आहे. इतकी लाजत बसशील तर घर कसं चालेल, मुली!'

त्या देवघरात गेल्या आणि त्यांनी दरवाजा बंद करून घेतला.

देवघराच्या दरवाजाजवळ खांबाला धरून कितीतरी वेळ एक मुलगा उभा होता. मला पाहून तो जवळ आला. पदराचा शेव पकडून हसत हसत म्हणाला, 'नवी आई!' त्याला काखेत घेऊन मी माझ्या खोलीत आले. त्यावेळी खोलीत आणखी कोणी नव्हते. हळूवारपणे त्याला विचारलं, 'नाव काय तुझं?'

'नटो तर आहे!' त्यानं सांगितलं.

मी विचारलं, 'कारे नटो, तू मला कसं काय ओळखलंस?'

'अरे वा! आमची दाया तर म्हणत होती, कितीतरी दिवसापासून की, तुझी नवी आई येईल. तुझे वडील जातील आणि वाजंत्री लावून घेऊन येतील.

'ही दाई कोण?'

'अरे, तुला माहीत नाही? तीच -ती सौरभी! आता तू आलीस ना-तेव्हा तर ती दरवाजावरच उभी होती.

कदाचित तीच मोलकरीण असेल. मी विचारलं, 'काय रे, ही दाई इथं काय करते?'

'मला दूध पाजते, फिरायला घेऊन जाते. पूर्वी तर मी तिच्याजवळ झोपत होतो पण आता बऱ्याच दिवसापासून आजीजवळ झोपतो.'

पुन्हा विचारलं, 'काय रे, ही दाई मारते का तुला?'

'खूऽऽप, दूध घेतले नाही तर, कधी रूसलं तर ती चक्क छडी घेऊन ठोकून काढते.'

'बाबा काही म्हणत नाहीत तिला?'

'नाही फक्त हसून बाहेर निघून जातात.' काही वेळ विचार करून मग म्हणाला, 'ऐकलं की, तिनं बाबूवर काहीतरी मोहिनी घातली आहे.' 'आणि आजी?' मी विचारलं, 'ती काही म्हणत नाही तिला, तिने ठोकून काढल्यानंतर?'

''ती तर नेहमी देवघरातच बसलेली असते. ती बाहेर अंगणात तर कधी येतच नाही.'' त्याने सांगितले.

ऐकता ऐकता माझे दोन्ही डोळे पाण्याने डबडबून आले. आई विना पोरकं असहाय पोर! त्याच्याबद्दल कोणालाच थोडीशीही माया नाही! दोन्ही हातांनी त्याला हृदयाजवळ घेतलं आणि

मनाशीच म्हणाले, 'तुझं कुणी असो की नसो, मी तर आहे ना तुझी.'

हे घर जमिनदाराचं आहे. घरात फार माणसं नसली तरी नोकर-चाकरांचा राबता असल्याने सगळे व्यवहार संपायला खूप रात्रच होत असे. आज तर हे घरीच नाहीत. रात्रीच्या दोन प्रहरपर्यंत अंगणात वर्दळ चालू होती.
रात्री उशिरा एक एक करून सर्वजण आपापल्या घरी गेली. खोलीत अंथरूण टाकून आता झोपणारच होते तर नटोचा आवाज आला, 'नवी आई, झोपी गेलीस का? मी तुझ्याजवळ झोपेन.'

मूलच ते. केवळ माझ्याजवळ झोपायचे म्हणून त्याला झोपच येत नव्हती! मायेला किती हापापलंय बिचारं! त्याला कुशीत घेऊन म्हटलं, 'ये, माझ्याजवळ झोप. आजीजवळ नाही झोपला आज?'

तशी त्यानं सांगितलं, 'आजीला सांगितलं मी की, आज नव्या आईजवळ झोपेन म्हणून.'

'त्यांनी काय म्हटलं मग?' मी विचारलं.

'म्हणाल्या, ठीक आहे. जा.'

तो माझ्या सवतीचा मुलगा होता. पण का कुणास ठाऊक माझ्या करपलेल्या हृदयात त्याच्यासाठी कुठूनतरी प्रेम उचंबळून येऊ लागले होते.

बाहेरून सौरभीचा आवाज आला, 'नटो, झोपायला चल.'

माझ्या गळ्यातले हात अधिकच घट्ट करून व्याकूळ आवाजात नटो म्हणाला, 'नवी आई, तिला सांग की, मी आज इथेच झोपेन. तुझ्याजवळ'.

सौरभीनं पुन्हा हाक दिली, 'नटो, चल. आजी बोलावतेय.'

तो म्हणाला, 'आजीला सांगून आलोय की मी इथंच झोपेन म्हणून.'

'तर मग चल, माझ्याजवळ झोप.'

आता मात्र गप्प बसणं शक्य नव्हतं. म्हणाले, 'मूल म्हणतंय तर झोपू द्या त्याला आज इथंच.

माझ्याकडे डोळे फाडून पाहात ती म्हणाली, 'वितभरचं कार्टही शहाणपण शिकवतंय. चल. माझ्याजवळ झोपायचं. घाबरून कठपुतळीगत मुलगा पडून राहिला होता. माझ्याजवळून झटका मारून मुलाला ओढत सौरभी म्हणाली, 'चल, सैतान कुठला की.... ठोकून हाडांचे तुकडे तुकडे करून टाकीन.'

डोळ्यात पाणी गाळत, माझ्याकडे पाहात पाहात नटो तिच्याबरोबर निघून गेला. वाटत होतं की, आपल्या शरीराचा एखादा तुकडा कोणी कापून नेतंय जणू. चटाई तिथंच टाकून बाहेर वऱ्हांड्यात येऊन बसले.

त्याच्या दुसऱ्या दिवशीच मालक परत आले. आत बाहेर सर्वत्रच नोकरांची आणि मोलकरणींची

धावपळ झाली. वाटले, आपलाही काळ आला.

मागच्या रात्रीची घटना आठवून माझे शरीर थरथर कापत होते. अतिशय कष्टानं तो विचार मी माझ्या मनातून झटकून टाकला आणि विचार केला, ते कितीही वाईट असले तरी -शेवटी माणूसच आहेत ना? ते माझं ऐकणार नाहीत?

अंगणात त्यांचा आवाज ऐकायला आला. माझ्या समोरच्या खिडकीतच त्यांचे कपडेलत्ते असायचे. उघड्या दरवाजामधून जे दृश्य पाहिलं त्यामुळे तर माझं मन घृणेनं काठोकाठ मरून गेलं. मालक पलंगावर बसलेले आणि सौरभी त्यांच्या शर्टाचे बटनं काढते आहे. दोघेही हसत हसत काहीतरी बोलताहेत. मला पाहून त्यांनी दरवाजा पुढे लोटून घेतला.

वाटलं, अपमानाचे सोळा आणे मरायला आता बाकी तरी किती आहेत!

खोलीत भिंतीच्या आधाराने बसून राहिले तर एका मोलकरणीनं वाटीभर दूध आणून माझ्यापुढं ठेवीत म्हटलं, 'सुनबाई, सौरभी दायीनं सांगितलंय की, नाटो बाबूला दूध पाजवा.'

जणू ऐकलं नाही असं दाखवीत मी म्हटलं, 'कुणी सांगितलय?'

'सौरभीनं'

एक लाथ मारून वाटी फिटी उडवून लावावी असं वाटून गेलं! राग दाबून म्हणाले, 'माझ्यानं होणार नाही. तिलाच द्यायला सांग.' थोड्याच वेळानं त्या खोलीतून आवाज आला, 'होणार नाही? मग इथं काय मालकीण होण्यासाठी आलीस की काय? जा, नाटो जा त्या खोलीत.'

माझ्या खोलीचा दरवाजा धाडकन् उघडून सौरभी आत आली. नाटोला तिनं ओढत तिथं आणलं आणि त्याला तिथंच सोडून निघून गेली. नाटो माझ्याजवळ बसत म्हणाला, 'नवी आई, फार भूक लागलीय.' त्याचा तो आवाज ऐकला आणि माझा सगळा राग, सगळा अपमान कुठल्या कुठे गेला. दूधाची वाटी जवळ ओढत ओढत म्हणाले, 'ये पाजते तुला.'

○ ○ ○

सगळी दुपार अशीच गेली. झोपण्याचा प्रयत्न करण्यात. झोप येता येत नव्हती. परंतु वाटत होते, आता जर झोपलो नाहीत तर रात्री झोप येणार. आपण झोपलो आणि त्या दिवशीसारखा अत्याचार त्यांनी केला तर! याच भयानं अंथरूणावर नुसती डोळे मिटून पडून राहिले.

जेव्हा उठले तेव्हा दिवे लागलेले होते. दिवस बुडाला होता. तरीही उठावंसं वाटत नव्हतं. त्या अंधाऱ्या खोलीत पडल्या पडल्या आज रात्रीसाठी मी सगळा धीर एकवटत होते.

मालक घरातच आहेत म्हटल्यावर त्या दिवशी सगळ्यांचं खाणंपिणं लवकर आटोपलं. अंगणातील लोकांची गर्दी कमी होत गेली. वाटलं -हे परमेश्वरा, कालच्यासारखाच आजही नाटो माझ्याजवळ झोपायला आला तर! परंतु नाटो आला नाही. आली एक मोलकरीण. दिवा घेऊन. थोडंसं खाकरून आणि थोडंसं हसून तिनं सांगितलं, 'सुनबाई! त्या खोलीत जा. मालक बोलवीत

आहेत.' दरवाजाकडं पाठ करून ते पलंगावर पडले होते. जागेच असावेत. माझ्या पावलांचा आवाज ऐकून वळून माझ्याकडे पाहू लागले. म्हणाले, 'इथं ये'. प्रत्येक गोष्टीला विरोध करायला नको वाटत होतं, पलंगाच्या जवळ जाऊन उभी राहिले. ते उठले आणि त्यांनी मला पलंगावर झोपवले. त्यानंतर ते स्वतः माझ्याजवळ येऊन झोपले. इतक्या जवळ की, त्यांचे गरम श्वास अंगाला भिडत होते. वाटून गेले की म्हणावे, 'इतकं चिकटून झोपलं तरच कळणार आहे का की आपण पती पत्नी आहोत म्हणून? पण विचार केला, आज सगळं सहन करू. कितीही सतावलं तरी.

काही वेळ गेला.

ते म्हणाले, 'पाहा, आज परत त्या दिवशीसारखं माझ्याशी युध्द करू नकोस. कळलं ना! ओढा ओढी, ताणा ताणी! मी काय कोणी वाघ आहे की सिंह आहे तुला खायला?'

त्यांनी हळू हळू माझ्या पाठीवर हात फिरवायला सुरुवात केली आणि जवळ ओढून घेतलं. मी काही म्हणाले नाही. ते म्हणाले, 'चांगल्या मुलांसारखं तू आज गुपचूप झोप. त्या दिवशीसारखं हातपाय झाडून मला परेशान करू नकोस.

यावेळी त्यांनी मला इतकं जवळ ओढलं की, मी त्यांच्या छातीलाच जाऊन भिडले. मी एकदम उठून बसले. काहीशा कठोर आवाजात म्हणाले, 'ओह! हे काय चालवलंय?'

इतकं म्हटलं आणि गप्प बसले. आता वीज कोसळणार असं मला वाटत होतं. परंतु ते धिम्या आवाजात म्हणाले, 'चांगली गोष्ट आहे. मी तुला काही म्हणत नाही. आत झोपी जा. लहान आहेस अजून. तुला काही कळत नाही. म्हणून या सगळ्या गोष्टी विषासारख्या वाटताहेत. मीही जबरदस्ती करीत नाही. परंतु केव्हापर्यंत अशी अज्ञानी बनून राहणार आहेस? नवरा काय असतो हे जर तुला कळले असते तर तू असं केलं नसतंस. आपल्या हिंदूंमध्ये तो मालक असतो पत्नीचा.'

त्यांचं बोलणं अडवीत म्हणाले, 'मला माहीत आहे'.

ते हसले, 'नाही नाही तुला कांहीही माहीत नाही. जन्मोजन्मी पतीशिवाय पत्नीला कांहीही स्थान नाही, असे मुळी शास्त्रातच लिहिले आहे.

मी तोंड उघडले नाही.

ते म्हणाले, 'तू अजून मुलगी आहेस म्हणून तुला काही म्हणत नाही, समजलं? परंतु तुझं असंच वागणं राहिलं, आणि मला जर चीड आली तर तुझे काय हाल होतील ते माहीत आहे ना?

'काय होतील?' विचारलं.

'तुला खायला मिळणार नाही. अशा प्रकारे माझ्याजवळ तुला पलंगावर झोपता येणार नाही. घरातल्या सगळ्या लोकांचं जेवणखावण झाल्यावेर त्यांचं उष्टपाष्टं खाऊन मोलकरणी जशा पडून राहात तसं तुला राहावं लागेल, कोणी कोणी विचारणार नाही तुला.' ते माझ्या तोंडाजवळ तोंड

आणून समजावण्याचा प्रयत्न करू लागले.

मी दुसरीकडे तोंड वळवून विचारलं, 'बस इतकंच?' ते म्हणाले, 'आता माझा तुझ्यावर सोळा आणे अधिकार आहे, तुझं मी आता काय वाटेल ते करू शकतो. त्यासाठी मला आता कोणी काही म्हणू शकणार नाही, हे तरी तुला कळतच असेल की?'

गोळाभर अन्नासाठीच तर इथं आलेय ना! आणि बड्या धेंडांच्या वासना तृप्तीसाठीच ना! वेदनेनं गळा दाटून आला होता माझा.

ते पुन्हा म्हणाले, 'केवळ एवढेच नाही तर आजच तुला घराबाहेर काढून दुसरा विवाहही करू शकतो. तुझ्या या असल्या वागण्याकडे पाहून मी जर ते वास्तवातच आणले तर तुझी काय दशा होईल, याचा एकवेळ तरी विचार केलास का? तुझी सवत मग राणी होऊन पलंगावर बसेल आणि तू मात्र मोलकरणीसारखं व्हरांड्यात पडून राहशील. उठता लाथ आणि बसता बुक्की अशी तुझी अवस्था होईल.

म्हणाले, 'माझ्या घरी निघून जाईन मी.' ते हसले. मग म्हणाले, 'निघून जाशील खरी पण तिथं शिव्या खाव्या लागतील. बापाच्या घरी कोणी विचारणार सुध्दा नाही. उठता बसता सगळे तुझा धिक्कार करतील. तेव्हा तुझा बाप अपमान सहन न होऊन एके दिवशी इथं आणून टाकून जाईल.'

असलं हे बोलणं ऐकून साऱ्या शरीरात जणू सुया टोचत आहेत असं वाटतहोतं. म्हणाले, 'मी जाईन निघून कुठंही.'

'कुठे जाऊन काही सुटका होईल असं वाटतंय की काय? दुसरा विवाह करून तर तुला आरामात राहता येणार नाही. हां, जोपर्यंत तुझं रूप आणि तारूण्य शिल्लक आहे तोपर्यंत तुला गोळाभर अन्नाची कमी पडणार नाही.'

किती घाणेरड्या आणि वाईट गोष्टी बोलत आहेत हे. हे असले शब्द यांच्या जिभेवर आलेच कसे. आणि तेही आपल्या पत्नीसाठी? घृणा आणि दगदगीमुळे स्तब्ध पडून राहिले. त्यांनी परत माझा हात पकडला आणि म्हटलं, 'मुलासारखं राहा पण बालबुध्दी तेवढी सोड. असं म्हणता म्हणता त्यांनी मला दोन्ही हातांनी गच्च पकडले आणि चुंबन घेतलं.... माणसाच्या सहनशक्तीचीही एक सीमा असते. आता मात्र मला गप्प बसणं अशक्य झालं. सर्व शक्तीनिशी स्वतःला सोडवून घेण्यासाठी मी धडपडू लागले. म्हणाले, 'सोडा मला, नाही तर आरडाओरडा करायला लागेन मी आता.'

आपल्या छातीवर पूर्वीसारखंच आवळून ते म्हणाले, 'हजारवेळा ओरड, कोण ऐकणार इथं? उलट सकाळ झाली की सगळे तुलाच शिव्या घालतील. तुझी टिंगल करतील.'

त्यांचं तोंड हळूहळू माझ्या तोंडाजवळ आलं. आता मात्र सहन करणं केवळ अशक्य झालं. खूप जोरानं त्यांच्या हाताला झटका देऊन बाहेर निघून आले. व्हरांड्याच्या खालीच एक पक्की विहीर होती. माझ्या मागेच ते येताहेत हे पाहून मी ओरडले, 'माझ्याबरोबर जर तसं केलं तर मी

विहिरीतच उडी घेईन, लक्षात ठेवा.'

भीतीमुळे ते व्हरांड्याच्या खाली उतरले नाहीत. तिथूनच संतापाने फणफणत ते गरजले, 'थांब, तुला सरळ करतो.' त्यानंतर ते खोलीत गेले आणि त्यांनी धाडकन् दरवाजा बंद केला.

मागच्या बाजूस असलेल्या बागेतील अंधार कान देऊन सगळं काही ऐकत होता. आणि भीतीने मात्र माझं शरीर थरथर कापत होतं, एखाद्या झाडाच्या पानासारखं डोक्यावरून एक घुबड विचित्र असा आवाज करीत उडून गेलं. तिथंच कठपुतळीसारखी उभी राहून विचार केला -नाही, जीवनभर माझं यांच्याशी पटणं शक्य नाही. प्रयत्न करणंच विफल आहे. सूर्योदयाच्या वेळी पसरलेल्या कोवळ्या उन्हावर धुक्याची रजाई पसरवून हिवाळ्यातली सकाळ उगवत होती.

पुष्कळ ठिकाणी साळीची पिकं काढणीला आली होती. त्याचाच तीव्र प्रसन्न सुगंध सर्वत्र पसरला होता. चार पाच दिवसांपासून म्हणजे त्या दिवसांपासून ह्यांनी मला काही म्हटलं नव्हतं, आजकाल सौरभीबरोबरच त्यांच्या जास्त गप्पा टप्पा चालू होत्या. जाणूनबुजून ते असं करीत होते. पुन्हा पुन्हा माझ्या दृष्टीला पडेल, अशा पध्दतीने ते वागत होते. या घरात मीही आहे हे जणू ते संपूर्णतः विसरूनच गेले होते. मीही खूप सावधपणेच राहते. रात्रीच्या वेळी नटोला घेऊन मी दुसऱ्या खोलीत झोपते आहे. जेवणखाण झाल्यावर ह्यांच्या खोलीत जाण्यासाठी कोणी सांगत नव्हते. तरीही ते या खोलीत येतील की काय अशी भीती वाटत राहायची. त्यामुळे रोज झोपण्याच्या पूर्वी मी दाराची कडी लावून घेते आहे. रात्री कधीतरी जाग आली तर ह्यांचा आणि मोलकरणीचा आवाज कानावर पडत असे. ती बोलणी गोफणीतून आलेल्या दगडासारखी अंतःकरणाला लागत होती. विचार करते, की जाऊन सगळ्यांना उठवावं आणि म्हणावं की पाहा. पुन्हा मनात येतं. करू देत त्यांना जे चांगलं वाटतंय ते, यात माझं काय जातंय?

माझी सकाळ सासूबाईच्या सेवेत व्यतीत होते. एके दिवशी मी अंघोळ - न्हाणं आटोपून देवघरात चंदन उगाळीत होते तर सासुबाईनी येऊन सांगितलं, 'सुनबाई! भांडार कोठडीची किल्ली तू तुझ्याजवळ ठेव. देणं घेणं आता माझ्यानं जमत नाही'.

हळुवारपणे म्हणाले, 'मी सांभाळू शकेन!'

त्या मितभाषणी आहेत. म्हणाल्या, 'नाही तर कोण सांभाळील मग? परमेश्वराच्या पूजेतून मला एक क्षणाची फुरसत मिळत नाही. या किल्ल्या मी तुझ्याशिवाय कोणालाही देऊ शकत नाही.'

नको वाटत होतं पण नकार देऊ शकले नाही मी. त्यांच्याकडून किल्ली घेतली. त्या दिवशीपासून माझं आणखी एक काम वाढलं. वाटलं अशा प्रकारे कुठल्यांना कुठल्या कामांमध्ये गुंतवून घेणं आणि स्वतःला विसरणं हेच चांगलं आहे. लवकरच दुसरी सगळी कामं संपवून भांडार कोठडी उघडली. सौरभी दारात उभी होती. मला पाहताच स्वतःशीच बडबडत तिथून निघून गेली.

खूप मोठी खोली होती ती. परंतु आत इतकं सामान होतं की पाय ठेवायलाही जागा नव्हती. कुठं काय ठेवलंय हे शोधालयलाच मला तासभर वेळ लागला. सगळ्या गोष्टी खाली उतरवून परत लावीत होते तर तेवढ्यात मोलकरीण चंपाबाई येऊन म्हणाली, 'सुनबाई, स्वयंपाकाचं सामान दे.

स्वयंपाकी महाराज केव्हापासून उभा आहे.'

० ० ०

गेल्या काही दिवसांपासून ऐकून पाहून जे माहीत झालं होतं त्यावरून सगळ्या वस्तूंनी टोपलं भरून चंपाबाईजवळ देऊन स्वयंपाकघराकडे पाठवून दिलं. पुन्हा सामान लावण्याच्या वेळी अचानक नटोची आठवण झाली -अरे! नटोने आतापर्यंत दूध घेतलंच नाही. खोलीच्या बाहेर येऊन कुलूप लावलं. मातीच्या तुटलेल्या घोड्यावर बसून नाटो खेळत होता. मला पाहून म्हणाला, 'नवी आई, मला एक चांगला घोडा घेऊन दे ना.' म्हणाले, 'घेऊन देईन बरं, माझा राजा आहेस ना तू, चल दूध पिऊन घे.' 'घेऊन देशील ना? खरं सांग, माझी शपथ खा बरं?' म्हणाले, 'घेऊन देईन बाबा, ये.'

आपल्या खोलीत बसून नाटोला दूध पाजत होते. तशी स्वयंपाकघरातून सौरभीचा आवाज येऊ लागला, 'हे सगळं काय आहे? दाळ तांदूळ तर हाताच्या बोटावर मोजता येतील. बटाटे नाहीत, कांदे नाहीत, आमचे मालक काय असलं अन्न खातील. येतात तर कसल्या घरांमधून येतात कोणास ठाऊक, जर सामान देता येत नसेल तर कमरेला किल्ल्यांचा जुडगा लटकावून फिरण्याची ही हौस कशासाठी?'

इतका अपमान! एवढ्या लोकांसमोर आणि तोही एका मोलकरणीकडून! वाटत होतं की त्याच क्षणी तिला घराबाहेर हाकलून द्यावं, पण काही इलाज नव्हता. तिथंच गुपचूप बसल्या बसल्या संतापाने स्वतःच जळून गेले.

नाटो म्हणाला, 'नवी आई, ही सौरभी फार भांडकुदळ आहे ना?'

दीर्घ सुस्कारे सोडत म्हणाले, हां, चल तू पिऊन घे.'

हिवाळ्याची मुलायम उन्हं घराच्या बाजूला तिरपी होऊन दूरपर्यंत पसरलेली होती. दुपारच्या वेळी सगळ्यांची खाणीपिणी आटोपल्यावर सगळे लोक इकडेतिकडे झोपले होते. मी माझ्या खोलीतच होते पण झोप लागली नव्हती. एकाएकी बाहेर कोणाच्या तरी पावलांचा आवाज आला. दरवाजाकडे पाहिलं माझे यजमान होते.

डोक्यावर पदर घेऊन मी झटपट उठून बसले. खोलीत येऊन हे म्हणाले, 'ती किल्ली दे बरं!'

मी विचारलं, 'कोणती किल्ली?'

म्हणाले, 'भांडार कोठडीची किल्ली.'

'काय करणार?'

संतापानं म्हणाले, 'काय करीन, का? तुला एवढा जमाखर्च हवाच कशाला? सांग बरं?

म्हणाले, 'सासुबाईंनी किल्ली कोणालाही देऊ नको असं सांगितलंय.'

'ठीक आहे. ते मी नंतर ऐकेन, आधी किल्ली दे.'

संतापानं झटक्यात किल्ली फेकून अंथरूणात तोंड लपवून पडून राहिले. किल्ली उचलून ते त्या खोलीत निघून गेले. असं वाटलं की ही सगळी सौरभीचीच करामत. माझ्याजवळ घरातली एक अत्यंत महत्त्वाची वस्तू असावी हे कदाचित तिला मान्य नसेल. या घरात तिचा माझ्यापेक्षा अधिक अधिकार आहे हे मी आल्यापासून पाहतेय. ती प्रत्येक बाबतीत मला हलकं पाहण्याचा प्रयत्न करते, पण माझ्यावर तिचा एवढा राग काय म्हणून? मी तर कधी तिचं काही बिघडविलेलं नाही ना? तर मग ती माझा उठताबसता अपमान का करते? मनात आलं, सासुबाईंना ही गोष्ट सांगितलं तर काय होईल? मग म्हटलं, जाऊ दे. त्यांच्यासारख्या शांत स्त्रीला या कटकटींमध्ये ओढून अनावश्यक त्रास देण्याची काही गरज नाही. स्वतः होऊन तिला माहिती झालं तर होईल.

लग्नाच्या दिवसापासूनच तर माहीत झालं होतं की माझं भाग्यच फुटलंय म्हणून. या एका बाबीमुळे ते थोडंस सुधारणार आहे?

चंपाबाईनं येऊन हाक मारली, 'सुनबाई! दिवे लागले, भांडार कोठडी उघडायची नाही का?' म्हणाले, 'माझ्याजवळ किल्ली नाही, जा.'

हे ऐकून ती आकाशातून जणू उडाली, -'तुमच्याजवळ नाही तर मग कोणाजवळ आहे माय?'

'मला माहीत नाही, जा, 'चिडून मी म्हटले.'

बाहेरून सौरभीचा आवाज आला, 'ए चंपा मा, इकडे ये.'

नेमकं काय झालंय ते चंपाबाईला समजलेच नाही. मूर्खासारखी काही वेळ माझ्याकडं पाहात खोलीतून निघून गेली. बाहेर भांडार कोठडी उघडण्याचा आवाज माझ्या कानाला सुयीच्या टोकासारखा टोचत होता.

o o o

संध्याकाळी नटो इकडे तिकडे बाहेर फिरत होता. धावत माझ्याजवळ आला आणि म्हणाला, 'नवी आई, बाबांना खूप ताप आलाय. ते व्हरांड्यात बसलेले आहेत आणि त्यांना हुडहुडी भरली आहे.'

आज दुपारी तर काही नव्हतं. थोड्याच वेळात हा ताप आला कसा? विचारलं, 'कारे, खरं सांगतोस का?'

'हा खरंच. वाटलं तर पाहून घे.'

विचारलं, 'आजी कुठं आहेत?'

'त्यातर तिकडे पलीकडे देवघरात आहेत.'

संध्याकाळ झाली होती. झोपण्याच्या खोलीच्या मागच्याबाजूस व्हरांड्यात एक खूर्ची घालून हे

बसले होते. कदाचित् डोळे मिटून पडले असतील. पावलांचा आवाज न होऊ देता जवळ जाऊन उभी राहिले.

डोळे न उघडताच हे म्हणाले, 'कोण?'

हात लाऊन पाहिलं शरीर गरम होतं. आगीसारखं. म्हणाले, 'खोलीत चला.' त्यांच्या झोपायच्या खोलीत खाट टाकलेली होती त्यावर गुपचूप लवंडले. खोलीचा दरवाजा पुढे करून बाहेर आले. चंपामाला सांगितलं, 'जा, सासुबाईला बोलावून आण.'

दुसऱ्या अंगणातून परत येत पंचमा म्हणाली, 'मालकीनबाई देवघरात आहेत, दरवाजा आतून बंद आहे.'

'सौरभी कुठं आहे?'

ती म्हणाली, 'माहीत नाही मालकीनबाई कुठे गेली कुणास ठाऊक पण सकाळपासून गायब आहे?'

फार ताप असल्यामुळे ते तळमळत होते. मला बाहेर ऐकू येत होतं. त्यांच्याजवळ जाऊन बसले आणि विचारलं, 'डोकं दुखतंय तर दाबू का?' दुसऱ्या कुशीवर वळत म्हणाले, 'नाही, राहू दे.'

काही वेळ गेला.

पुन्हा त्यांचा हात माझ्या मांडीवर येऊन पडला. सरकले नाही. शांतपणे बसून राहिले. तेव्हा अंथरूणावर आपले डोके थोडेसे वर उचलून त्यांनी हाक मारली, 'सती, निघून गेली का?'

त्यांच्याजवळ वाकून विचारलं, 'काय?'

'सौरभी कुठं आहे? बोलव बरं तिला.' एकाएकी कठोर होऊन बोलून गेले, 'तिला काय मी पदरात बांधून फिरतेय?'

ते गप्पच राहिले. मी उठले आणि दरवाजा लोटून ताड ताड तिथून निघून आले.

रात्र बरीच झाली होती. सौरभी अजूनपर्यंत परतली नव्हती. विचार केला, त्यांची प्रकृती बरी नाहीय. अशा अवस्थेत नाराज राहणं बरं राहील का? छी छी.

अजून सासुबाई देवघरातून बाहेर आल्या नव्हत्या. पुन्हा ह्यांच्या खोलीत जाऊन जवळ बसले. आणि पाय दाबू लागले. त्यांना झोप लागत आलेली असावी.

विचारलं, 'कोण सौरभी का?'

उत्तर दिलं, 'नाही, मी.' डोकं उचलून त्यांनी एकवेळ माझ्याकडं पाहिलं आणि त्यानंतर काय वाटून कोणास ठाऊक पाय ओढून घेतले.

अपमानाच्या तीव्र जाणिवेनं डोकं फुटून निघण्याची वेळ आली. वाटलं, निघून जावं. तर

दरवाजा उघडून सौरभी आत आली. खोलीतला उजेड थोडा कमी करून तिनं दरवाजा आतून बंद करून घेतला. त्यानंतर ती खाटेजवळ आली आणि मला पाहिल्याबरोबर गोंधळून चटकन बाहेर पडली. पायाखाली साप आल्यावर लोक ज्याप्रमाणे पळतात तशीच. हे झोपले नव्हते. कदाचित त्यांनी सर्व काही पाहिलंही असेल. पण झोपेचं सोंग पांघरून झोपले होते. लाजेमुळे असेल कदाचित.

मलाही तिथं बसणं बरोबर वाटत नव्हतं. आपल्या खोलीत येऊन दरवाजा बंद करून पडून राहिले. विचार केला, दोघांमध्ये इतकी रूचिभिन्नता आहे तर यांच्याबरोबर माझे निभेल तरी कसे? पहिल्या दिवसापासून सगळं माहीत असताना आज मी का बरं अपमान सहन करायला तयार झाले? तो म्हणाला, दोन तीन दिवसानंतर त्यांचा ताप अधिकच वाढला. माझी सासू तिथंच कायम बसून त्यांची सेवा करीत होती. विचार केला, चांगलंच झालं आपल्याला तिथं न जाण्यासाठी एक योग्य कारण मिळालं. परंतु जाऊन तरी काय होणार होतं! ते तर माझ्याशी बोलत नाहीत.

त्या दिवशी न्हाणं - अंघोळ झाल्यावर देवासाठी फुलांचा हार गुंफीत होते, तर चंपामानं येऊन सांगितलं, 'सुनबाई, तुझ्या माहेराहून कोणीतरी आलंय.'

हार तिथंच ठेवून म्हणाले, जा, पाठवून दे इथंच.' अचानक मनात आलं, कुठं नाथभैय्या तर आले नसतील? चंपामा जात होती तर तिला बोलावून सांगितलं, 'चल मी येतेच आहे. कुठे आहेत ते?'

नाथभैय्या आले असतील? काही कळत नाही. त्यांना माझी आठवण तरी असेल का? देवघर बंद करून तिकडे गेले. माझं सगळं शरीर फुलकित होऊन थरथरत होतं. खोलीत जाऊन पाहिलं तर ते नाथभैय्या नव्हते तर आमच्या घरचा म्हातारा नोकर होता तो.

जवळ जाऊन विचारलं, 'काय रे सईता, तू इथं कसा?'

तो म्हणाला, 'मालकांनी तुम्हाला पाहून येण्यासाठी पाठविलंय.'

विचारलं, 'आमच्या घरी सर्वजण खुशाल आहेत ना?'

'हो. सगळे खुशाल आहेत.'

'तू आला तेव्हा वडील काय करीत होते?'

'बाहेर बसले होते.'

'आणि आई काय करीत होती?'

सईता हंसला. म्हणाला, 'ज्या दिवसापासून तू आलीस मुली, त्या दिवसापासून कोणाच्या चेहऱ्यावर हासू उरलंय म्हणतेस की काय?' मला इथं पाठवितांना मालकीनबाई फार रडल्या. म्हणाल्या, सईता जातोस तर माझ्या पोरीला विचार की तिला सासू बरं पाहते की नाही ते? जेवणखाण व्यवस्थित मिळतं की नाही?'

सासरी गेलेल्या मुलीच्या दृष्टीने या प्रश्नांना अर्थ नसतो. ते प्रश्न केवळ उपचारच असतात. ऐकता ऐकता माझ्याही नकळत माझे डोळे डबडबून आले. दुसरीकडे तोंड फिरवीत विचारलं, 'का रे मला घेऊन जाण्याच्या संदर्भात वडीलकाही बोलले की नाही?' तो म्हणाला, 'हां, म्हणत तर होते एक दिवस. म्हणत होते ही उलटी -हगवण थांबली की मुलीला घरी आणू.'

आश्चर्यानं विचारलं, 'तिथं, गावात काही पटकी आली की काय?'

'त्याबद्दल काही विचारू नकोस पोरी. ब्राम्हण गल्लीत रोज दोघं मरताहेत. आज सकाळी मी घरून निघालो तर मधू भट ओकत होता. आतापर्यंत काय झालं असेल कुणास ठाऊक? तिवारींच्या घरचा नाथिया डॉक्टर आणण्यासाठी कटकला गेला आहे. तरीही आमच्या गल्लीकडे काही नाही.'

'काही नाही तर बरं आहे म्हणायचं', मी एक निश्चिंतीचा श्वास घेतला.

थोड्या वेळानं म्हणाले, 'जा, तू अंघोळ करून खाऊन-पिऊन घे. नंतर बोलू. मग चंपामाला म्हटलं, 'जा तर बरं यान्याबरोबर. तलाव दाखव.'

ο ο ο

त्या दिवशी ह्यांची तब्येत काहीशी चांगली होती. संध्याकाळी सासुबाई देवघरातून बाहेर निघाल्या तर मी दरवाजातच उभी होते. मला पाहून त्यांनी विचारलं, 'कोण सुनबाई का? काही विचारायचं का?'

हळूहळू म्हणाले, 'आमच्या गावात पटकी फार जोरात पसरलेली आहे.'

त्यांनी विचारलं 'बरं मग....?'

फार भीती वाटत होती तरी कसं तरी म्हणाले, 'दोन दिवसासाठी गावी जायची इच्छा आहे.'

असं वाटलं की माझं म्हणणं ऐकून त्या चिडतील. परंतु त्या चिडल्या नाहीत. फक्त थोड्या हसल्या. म्हणाल्या, 'मुली, तुला पाठविण्याबाबत मी अडवणार नाही. फक्त एक गोष्ट आहे. नटोचे जावळ अजून काढले नाहीत. पंडितजीनं पुढल्या बुधवारचा मुहूर्त काढलाय. शिवाय पोराच्या प्रकृतीस उतार पडावा म्हणून नवस केला होता. असं वाटतय की तुम्ही सगळ्या लोकांनी तिथं जाऊन एकाच चकरेत सारं करून यावं.'

त्या गेल्या. परत येताना म्हणाल्या, 'काळजी करू नकोस पोरी, तिथून परत आलात की ताबडतोब तुला गावी पाठवेन.' तांब्या सांभाळत त्या तिथून निघून गेल्या. त्या जिथपर्यंत दिसतील तिथपर्यंत मी त्यांच्याकडे पाहात राहिले. मग त्या भिंतीच्या आड झाल्या. मला वाटलं, अशी सासू मिळूनही मी का बरं दुःखी आहे? परवा सईता परत गेला. जातांना त्याला सांगितलं, 'सगळं तर तू पाहिलंच आहेस. वडिलांना सांग की कपिलेश्वराहून आम्ही परत येऊ तेव्हा माणूस पाठवून बोलवून घ्या. आणि नाथभैय्याला सांग की, एखाद्या दिवसासाठी इकडेही येऊन जा.'

तो म्हणाला, 'सांगेन बरे.'

० ० ०

कपिलेश्वरला जाण्याचा दिवस आता जवळ येत होता. फक्त दोनच दिवस उरले होते. तीन दिवसांपासून ह्यांना ताप होता. थोडा अशक्तपणा आला होता. फार दिवसानंतर ते

त्या दिवशी दुपारच्या वेळी व्हरांड्यात जेवायला बसले हाते. सासुबाई त्यांना पंख्यानं वारा घालीत होत्या. म्हणाल्या, 'परवा कपिलेश्वरला जायचं आहे ना -मग जी काय खरेदी करायची असेल ते मागवून घ्यावं.'

ते म्हणाले, 'काय खरेदी करायची करायचीय? जे काही बरोबर घ्यायचं ते सगळं घेतलंय. स्वयंपाकाचं सामानही बरोबर घ्यायला सांगितलंय. दूध, दही आणि दुसऱ्या वस्तूतर तेथे मिळतीलच. आणखी काय?'

'ठीक आहे. मग किती गाड्या आणि पालख्या सांगितल्या आहेत?'

'तीन पालख्या आणि सामान वगैरेसाठी दोन गाड्या.'

सासुबाईनं आश्चर्यानं विचारलं, 'तीन पालख्या कशाला रे?'

ते म्हणाले, 'का, तू येणार नाहीस?'

'मी येईन तर घरी कोण राहील रे?' सासुबाई म्हणाल्या, 'घरातले देव इथं काय उपाशी राहतील?'

हे म्हणाले, 'केवळ एका दिवसाचा तर प्रश्न आहे!'

'नाही पोरा, एक दिवस झाला म्हणून काय झाले, मी नाही येऊ शकत. सुनबाई जर घरी राहती तर तिने सांभाळले असते देव. हे काम अजून कोणी नाही करू शकणार हे माहीत आहे मला.'

त्यांचे शब्द ऐकून अभिमानाने मन भरून गेले. जेवण झाल्यावर हे हात धूत होते. म्हणाले, 'मुलाला बरोबर घ्यायचंय आणि मी तर असा निःशक्त झालोय. विचार करतोय की आणखी कोणातरी एकाला बरोबर घ्यावं...'

'आणखी कोण येणार बरोबर?'

'कोणी एक मोलकरीण वगैरे'.

'चंपा तर येतेच आहे ना?'

'ती म्हातारी झालीय, ती एकटी काय सांभाळू शकणार? आणखी कोणी...'

आईच्या चेहऱ्याकडे पाहून यजमान गप्प बसले. त्यावेळी संतापानं आईचा चेहरा कठोर झाला होता. तिथून जातांना त्या केवळ एवढंच म्हणाल्या, 'ठीक आहे, तुला जसं चांगलं वाटेल तसं

कर. परंतु मी आजच पुरीला जाते आहे.'

विचार केला, छे छे लाज शरम सगळी एकाच वेळी संपून जाते की काय लोकांची? आणि तीही आईच्या समोर? आई आज आज खरोखरीच पुरीस निघून जातील की काय? संध्याकाळी सासुबाई आपल्या देव देवतांसह पुरीला निघून गेल्या. वाटलं, यांच्यामुळेच त्रस्त होऊन सासुबाई इथून जात आहेत.

जाण्याच्या आधी मला बोलावून सांगितलं, 'सगळ्या गोष्टी तर तुला माहितच आहेत पोरी. मी तुला आता अधिक काय सांगू शकते? जरा चोहीकडे डोळे उघडे ठेवून लक्ष ठेव. महिनाभरात तर परतही येईन मी.'

मेणा वाहणाऱ्या भोयांचा आवाज रस्त्याच्या वळणावर अस्पष्ट होऊ लागला तशी मी भिंतीच्या आधारे बसून विचार करू लागले. आज माझा शेवटचा आश्रयही निघून गेला. त्यांच्यासाठीच तर सारं काही सहन करून मी इथं राहिले होते. घरातल्या एखाद्या निरूपयोगी वस्तू सारखी आहे मी. माझ्या अस्तित्वाची मलाच लाज वाटते. आता तर दिवसभराच्या कार्यभारात माझी कोणालाच आवश्यकता उरणार नाही-आता मला सुट्टी. हेमंत ऋतूच्या शेवटच्या दिवसातली एक मळकट संध्याकाळ क्रमाने गडद रात्रीत परिवर्तित होत होती. खोलीतल्या अंधारात स्वतःशीच म्हणाले, आज सासुबाई गेल्या, उद्या कदाचित मलाही अशाच प्रकारे जावं लागेल. जणू हा त्या अंधारात मी घेतलेला माझा शोधच होता.

o o o

त्या दिवशी आमच्याबरोबर सौरभीही कपिलेश्वर मंदिराकडे आली - माझ्यासारखीच एका वेगळ्या पालखीत बसून. अजून यजमान बाहेर आले नव्हते. चंपाबाईनं मला नेऊन पालखीत बसवलं. दुसऱ्या पालखीत सौरभीबरोबर नाटो बसला होता. मला पाहून म्हणाला, 'नव्या आईजवळ जातो.'

तशी त्याला धमकावत सौरभी म्हणाली, 'नाही. बस इथंच.'

माझ्याजवळ येण्यासाठी तो हट्ट करीत होता आणि रडत होता. परंतु कोणी ऐकलं नाही.

पालख्या उचलल्या गेल्या. गावचा रस्ता सोडून शेतांच्या मधोमध असणाऱ्या रस्त्यांवरून पालख्या हळूहळू जाऊ लागल्या. साळ कापायला आली होती दोन्ही बाजूची कमजोर धाटं सकाळच्या दवामध्ये भिजून चिंब होऊन रस्त्याच्या दोहोबाजूंनी वाकली होती. जणू एखाद्या रहस्यकथेतील स्वप्नपुरीकडे जाणाऱ्या सोन्याच्या पायऱ्याच दूरपर्यंत पसरल्या आहेत, असे वाटत होते.

खूप दूर आल्यावर एका नदीच्या किनाऱ्यावर पालख्या थांबल्या. हिवाळ्यातला दिवस, तरीही नदीला भरपूर पाणी होतं. नदीच्या त्या किनाऱ्यावर असणाऱ्या झाडाझुडपांमधून मंदिराचा कळस चमकत होता.

या किनाऱ्यावरून त्या किनाऱ्यावर अक्षरशः मुंग्यांच्या रांगांसारखे लोक जात होते. मग लक्षात आले की आज महादेवाच्या पुष्प अभिषेकाचा दिवस आहे. त्यामुळे एवढी गर्दी आहे.

आमच्या ह्यांचा मेणा सगळ्यात शेवटी आला. आल्या आल्या त्यांनी आज्ञा केली, 'उन्हं वाढताहेत. जास्त उशीर नको आता, चला, लवकर चला आता.' एका मोठ्या पाल लावलेल्या नावेत तिन्ही मेणे जवळ जवळ ठेवण्यात आले. आम्ही आत जसाच्या तसेच बसलेलो. नदी फार रूंद नव्हती, पण ओलांडता ओलांडता दिवस खूप वाढला. मंदिराबाहेर असलेल्या छोट्याशा बागेत भोयांनी मेणे ठेवले. यात्रा असल्याने इतकी गर्दी होती त्या दिवशी. इतकी गर्दी होती की, मोहरचीचा दाणा ठेवायलाही जागा सापडली नसती. नाटोचे जावळ काढून झाल्यावर माझ्या यजमानांनी त्याला नदीत अंघोळ घालून आणले. दुपार उलटली होती. आणि जेवण वगैरे सगळं तयार होतं. गर्दी कमी झाल्यावर संध्याकाळी परमेश्वराच्या दर्शनाला जायचे असे ठरविण्यात आले.

संध्याकाळ व्हायला आता वेळ तरी किती उरला आहे. गप्पा करता करता उन्हं उतरणीला लागली होती. संध्याकाळच्या वेळी गर्दी कमी होईल असे जे वाटलं होतं त्या ऐवजी गर्दी वाढलीच होती. चंपामानं येऊन सांगितलं, 'सुनबाई! मालकांनी सांगितलंय की, दिवस आता फारसा उरला नाही. चला, दर्शन घेऊन येऊ असे म्हणाले. 'नाटोला नवे कपडे घालून निघालेल्या चंपामाच्या मागे मी चालत होते. जिथून आमचे सगळे लोक माझ्या

नजरेच्या टप्प्यात होते. त्या गर्दीला अतिशय कष्टाने पार करीत सर्वात पुढे सौरभी होती तर तिच्यामागे माझे यजमान होते. सगळ्यांच्या मागे मी होते. माझ्यापुढे चंपामा होती. लोकांची गर्दी पाहून चंपामा मला म्हणाली, 'सूनबाई, माझा पदर धरून ये. मंदिरात गाभाऱ्याजवळ तर रस्ता अधिकच चिंचोळा आहे. दोन माणसांना एकदम आत जाणे शक्य नाही.' सगळ्यात अधिक गर्दी तिथंच होती. अंधार आणि उकाडा यामुळे श्वास रोकून मी कशीतरी आतपर्यंत गेले. परमेश्वराऐवजी तिथं एका माणसाच्याच डोक्यावर फुलं. तांदूळ वाहिल्या जात होते. ते पाहून गर्दीत रस्ताच सुधरला नाही. त्या धक्काबुक्कीत चंपामाच्या पदराचा शेव माझ्या हातून कधी सुटला ते कळलेही नाहीत.

मंदिरातील अंधारात खांबाला टेकून मी उभी होते. भीतीने माझं डोकं फिरायला लागलं होतं त्यावेळी! खूप वेळानंतर गर्दी थोडीशी कमी झाली. त्यातून मी काहीशी दबत दबत बाहेर आले. जिकडे नजर जाईल तिकडे माणसेच माणसे दिसत होती. त्यात आमचं कोणीही दिसत नव्हतं. मला सोडून गेले होते की काय आमचे लोक?

दिवस मावळत होता. पश्चिमेला काळवंडत एक वादळी काळा ढग हळूहळू वरच्या बाजूने सरकत होता. पावसाच्या भीतीने यात्रेकरूंच्या मनात चलबिचल सुरू झाली होती. सगळे लोक घाईघाईने घाटाकडे पळत होते. मंदिराच्या आवाराबाहेर नदीच्या किनाऱ्याकडे लोकांची गर्दी अधिकच उसळली होती. नाव एकच होती. पावसाच्या भीतीने तीत पहिल्यांदा चढण्याची सर्वांची घाई चालली होती. नाव माझ्यापासून दहा पंधरा हातांच्या अंतरावर होती. गर्दीत एक पाऊल पुढे सरकायला तसूभरही जागा नव्हती.

कशीतरी मान वर करून मी पाहिलं, आमच्या तीनही पालख्या नावेवर ठेवल्या गेल्या होत्या. भीतीने मला चक्कर येऊ लागली. त्याच वेळी माझ्यासमोरून एक गृहस्थ मंदिराकडे जातांना दिसले. विस्मय आणि आनंदाने माझ्या तोंडून जोराचे उद्‌गार निघाले, 'नाथभैय्या!'

कोणाला तरी शोधत असल्यासारखे चोहीकडे पाहात आणि गर्दी मागे लोटत, नाथभैय्या पुढे जात होते. बुडणाऱ्या माणसाला जमिनीचा स्पर्श झाल्यावर जसे वाटते तसंच त्यांना तिथं पाहून मला वाटलं. कुठल्या तरी जादूचा स्पर्श होऊन क्षणभरात माझी सारी भीती स्वप्नवत झाली. नावेजवळ लोकांची गर्दी काहीशी कमी होत होती. परंतु मी एखाद्या दगडासारखी उभी होते. प्रयत्न केला असता तर कदाचित नावेवर पोचू शकले असते. परंतु गेले नाही. कोणास ठाऊक कोणत्या मोहामुळे?

झाडाझुडपांना हलवीत हवेची एक तीव्र झुळूक सळसळत निघून गेली. नावेमध्ये नटो रडत आरडाओरडा करीत होता, 'नवी आई कुठं आहे, माझी नवी आई!'

आता मला गप्प बसवलं नाही. दोन्ही हातात जेवढं बळ होतं तेवढ्या ताकदीनिशी गर्दी हटवीत नावेकडे धावत गेले. पाण्याजवळ पोहचल्यावर पाहिलं, नावेनं किनारा सोडला आहे, तोपर्यंत जमीन - आकाश एक करून काळ्या ढगांची प्रलयलीला सुरू झाली होती. झाडाच्या प्रत्येक फांदीवर आंधळे वादळ घोंघावत होते. थकून मी तिथंच उभी राहिले. हवेमुळे डोके आणि छातीवरचे कपडे एखाद्या पताकेसारखे फडफडत होते. घाटावरची हजारो माणसं माझ्याकडे एकटक पाहताहेत याकडे तर माझं लक्षही नाही.

अचानक् मागच्या बाजूनं कोणीतरी माझ्या पाठीवर हात ठेवला.

दचकून पाहिलं, नाथभैय्या!

मी काही म्हणाले नाही.

समोर येऊन माझा हात पकडून म्हणाले, 'चल'.

○ ○ ○

त्यावेळी वादळ थोडं थोडं थांबत आलं होतं. मी मंदिराच्या ओवऱ्यामधील खांबाला पाठ लावून शांतपणे उभी होते. माझ्यापासून काही अंतरावरच नाथभैय्या उभे होते. कोणीच काही बोलत नव्हतं. जणू दोघेही आपापल्या चिंतांमध्ये बुडालो होतो.

कधी कोणास ठाऊक डोके वर करून त्यांनी हाक दिली, 'सती!', म्हणाले, 'उं'

ते म्हणाले, 'हवा कांहीशी कमी होत आली आहे. ही तर नुसती मोकळी जागा आहे. इथं सारी रात्र काढायची तरी कशी?'

मी काही म्हणाले नाही. ते परत म्हणाले, 'असं काही संकट येईल हे कोणाला माहीत होतं?' अंधारून येण्यासाठी आता फारसा वेळही नाही. रात्रभर मुक्काम करण्यासाठी जवळपास कुठलं

गावही दिसत नाही.' विचारलं, 'यांच गाव किती दूर आहे इथून?'

ते हसले. म्हणाले, 'खूप दूर, जवळजवळ चार-पाच मैल असेल. परत त्यातही नदी. नाववाल्यानं आपल्याला पलीकडे सोडलं पाहिजे ना.'

मग थोडा वेळ काही तरी विचार करून म्हणाले, 'तू थांबशील इथं एकटी? जवळपास कुठे राहायला एखादे घर मिळते का ते पाहून येतो.' म्हणाले, 'नाही, मीही येते तुमच्याबरोबर.'

हवेचा वेग आता जवळजवळ ओसरला होता. परंतु काळ्या ढगांमुळे सारे आकाश काळेभोर होवून गेले होते. जणू आता पाऊस सुरू होणार. बागेतून मंदिराच्या मागच्या बाजूनं जाणाऱ्या रस्त्यानं नाथभैय्या चालू लागले. मागे मागे मी होते. बागेच्या बाहेर पडलो. मंदिराच्या आवाराला लागूनच एक घर, कदाचित हॉटेल असेल, ते होते. बाहेरच्या ओट्यावर असलेल्या एका तुटक्या बाजेवर एक व्यक्ती तुटलेला चष्मा दोराच्या साहय्याने कसा तरी नाकावर आवरून जोरजोरात पोथी वाचत होती. त्याच्याजवळ एक चिमणी जळत होती. त्यातून बाहेर पडणाऱ्या प्रकाशापेक्षा धूरच अधिक निघत होता. पावलांचा आवाज ऐकून त्याने वर पाहिलं आणि मग विचारलं 'कोण आहे ते?

नाथभैय्या म्हणाले, 'एक प्रवासी'.

'काय पाहिजे होतं. ?

'अंधारामुळे गावाकडे जावू शकलो नाहीत. तर रात्रभरासाठी थोडी जाग मिळेल का इथं?

म्हातारा चिडून उडवून लावीत म्हणाला, 'नाही नाही, इथं काही जागा फिगा नाही. चला चोर आहात की डाकू तस्कर, कोणास माहीत बाबा! जा. आणखी कुठं पाहा.

नाथ भैय्या म्हणाले, 'आसपास तर काही गाव नाही दिसत सावकार! दुकानही दिसत नाही एखादे येथे. अशात आम्ही जावं तरी कुठं?

'कुठं मिळालं नाही तर मंदिराचा ओटा तर आहे ना, तिथं जा. खूप मोठा आहे. आरामात झोपता येईल.

'सारे छप्पर छिद्रांनी भरून गेलं आहे. जर पाऊस झाला तर मंदिराच्या ओट्यावर पाय ठेवायलाही जागा उरणार नाही. मग नाथभैय्या थोडं पुढं गेले आणि खाटेवर वीस रुपये ठेवून म्हणाले. 'आजच्या रात्रीपुरती आता इथंच आमची व्यवस्था करा सावकार.

पैसे पाहून सावकार चटकन् पाघळला. थोडा हसून म्हणाला, 'आपलीच माणसं जर संकटात सापडली तर काय करणार. कुठे तरी थोडा आश्रय दिलाच पाहिजे. या साहेब, असे ओटा चढून या. बरोबर आणखी कोण आहे? अच्छा अच्छा घरची मंडळी दिसतेय. तेव्हा तर पूर्ण एक खोली दिली पाहिजे.

हे शब्द ऐकून रक्तिम लज्जेची एक झुळूक माझ्या मनाला स्पर्शून आणि भावविश्वाला ढवळून गेली. पण हे सारे क्षणभरासाठीच.

बाजेवरून चिमणी उचलून सावकार घरात गेला. त्या अंधारात नाथभैय्या माझ्या जवळ येवून, खांद्यावर हात ठेवून हसत हसत म्हणाले, तू माझ्याबरोबर एकटी राहशील ना पण इथं!

म्हणाले, 'मी कुठेही राहू शकते.'

'भीती नाही वाटणार?

म्हणाले, 'मला भीती नाही वाटत.

ते हसले, म्हणाले, 'इतकी धाडशी केव्हापासून बनली आहेस तू? म्हणाले, 'जेव्हापासून गाव सोडलं.'

सावकार घरातून बाहेर येवून म्हणाला, 'एका खोलीवर काम निभेल ना साहेब? दुसऱ्या खोलीत सारं सामान साठून राहिलय. जा अंगणात जावून हातपाय धुवून घ्या. मी अंथरूण पाठवून देतो.' सावकार भिंतीकडे तोंड करून उभा राहीला. हेतू असा की मी जावं. नाथभैय्यानं माझ्याकडं पाहून थोडसं स्मित केलं. ती वेळ उभं राहून विचार करावयाची नव्हती. मी आत निघाले. नाथभैय्या माझ्या मागं आलेच.

आतल्या बाजूला अंगण होतं. त्याच्याच समोर मोठं दुकान होतं. जिथं सावकार बसलेला होता. एक छोटासा दरवाजा ओलांडून पुढे गेल्यावर समोर दोन खोल्या होत्या. भिंती मातीच्याच होत्या. खोलीचा दरवाजा उघडून नाथभैय्या म्हणाले, 'जा, आत जावून बैस. मी प्रकाशाची काहीतरी व्यवस्था करतो.

ते निघून गेले. तिथंच अंधारात थंडगार जमिनीवर बसून विचार करू लागले. व्यवस्था काही वाईट नाही. ही एकच खोली आहे, म्हणजे एकाच बिछान्यात रात्र काढावी लागणार म्हणायची. भीती आणि लाजेनं संपूर्ण शरीर कंपित झाले. परंतु त्यातही एक वेळ अलौकिक अशा सुखाची जाणीव झणकारून गेली मनभर. एक दिवस असंच कुणाबरोबर तरी बळजबरीनं एका पाठोपाठ दोन रात्री व्यतीत कराव्या लागल्या होत्या. परंतु तो दिवस आणि आज! किती अंतर, किती वेगळेपण!

अंथरूण आणि प्रकाश घेऊन नाथभैय्या परत आले. म्हणाले, 'सती, जेवणाचं काय?

म्हणाले, 'मी नाही जेवणार, मला भूकच नाही. तुम्ही जेवून या. खोलीत अंथरूण ठेवून ते बसले आणि हसत हसत म्हणाले, 'तर मग मलाही भूक नाही.

इतके खोडकर आहेत हे, जुन्या सवयी अजून कायम आहेत यांच्या, म्हणाले, 'खरंच, मला भूक नाही.

तर मग काय मी खोटं बोलतोय' त्याचं बोलणं ऐकून हसू येत होत. बाहेर उभं राहून सावकार ओरडला. 'साहेब, फराळ घ्या. नाथभैय्या बाहेर गेले आणि एका मोठ्या द्रोणात भरलेले रसगुल्ले आणि एक ताट घेवून आले. माझ्याजवळ सर्व ठेवून उभे राहिले. सगळा

फराळ थाळीमध्ये काढून त्यांच्यासमोर ठेवून म्हणाले. 'चला, आधी तुम्ही खावून घ्या.

ते आश्चर्यानं म्हणाले, 'आणि तू'

'तुम्ही खावून घ्या नं, मीही खाईन नंतर, मी म्हटलं.

'शब्द देऊन जर तो पाळला नाहीस तर मार खाशील बरं, लक्षात ठेव'. असं म्हणून ते खाऊ लागले. पण माझ्यासाठी खूपसं ठेवून उठले. खावंसच वाटत नव्हतं. पण शब्द पाळण्यासाठी थोडसं खावून थाळी धुवून आणली. तोपर्यंत नाथभैय्या खोलीत अंथरूण टाकून त्यावर बसले होते. परंतु हे काय? अंथरूण तर एकच आहे. माझ्या अंतकरणाचा थरथराट अधिकच वाढला.

मला पाहून म्हणाले, 'ये, बस.

थोडं बाजूलाच मान घालून जमिनीवर बसले. ज्योत मंद होत आली होती. ती वाढवून ते म्हणाले, 'आज मी परमेश्वराच्या दर्शनाला आलो याचं सार्थक झाल्यासारखं वाटतयं. जर मी आलोच नसतो तर तू काय केलं असतं याचाच विचार मी केव्हापासून करतो आहे. विचारलं, आम्ही सगळे इथं येऊ हे तुम्हाला कसं कळलं?

'का, सईताने तर मला सांगितलं होतं. आणि तूच तर त्याच्या हाती निरोप दिला होतास. मग न येवून भागलं असतं का?

हे ऐकून लाजेनं अर्धमेली झाले. वाटले, सईताने काय म्हणून हे सगळं सांगितलं मेल्यानं.

काही वेळ गेला.

ते म्हणाले, 'घाबरू नकोस तू सती. सावकाराला मी सांगितलय. उद्या एक पालखी करून तुला तुझ्या सासरी सोडण्याची व्यवस्था केलीय. समजलं ना? माझा चेहरा पाहात ते हसले.

किती आश्चर्याची गोष्ट आहे. जणू सासरला जाण्याच्या चिंतेने माझी तहानभूकच हरवली होती? की ते माझी थट्टा करीत होते? विचारलं, तुम्ही येणार नाहीत बरोबर?

मी? म्हणशील तर येईन की.

हे नाथभैय्या माझ्या प्रत्येक शब्दाला अमूल्य समजून सगळं दुःख-कष्ट उचलायला राजी असतात. यांच्यात आणि माझ्या पतीमध्ये ...... हे परमेश्वरा, माणसांमध्ये एवढं अंतर असतं? वाऱ्याच्या एका फटकाऱ्यानं खोलीतला प्रकाश विझून गेला. अंधारात दोघेही गप्प बसलो. कोणीच काही बोललं नाही . मग एक दीर्घ श्वास सोडून नाथभैय्यानं साद घातली.

'सती.'

म्हणाले, उंऽऽऽ!'

'सती दोन महिन्यापूर्वीच्या गोष्टी आठवतात तुला? जेव्हा या बाहेरच्या वादळासारखी तू मुक्त आणि स्वतंत्र होतीस, कोणाच्या बऱ्या वाईटाची चिंता तुझ्या मनाला स्पर्शतही नव्हती. अशाच पावसाळी रात्री आमची निशी मला हसत हसत सांगत आली होती की, भाऊ, बऊल आमच्या घरी येणार आहे. तेवढंच ऐकून किती स्वप्नाच्या आणि सुखद कल्पनांच्या जादुभरल्या दुनियेत मी गेलो होतो. परंतु आज या काहीच दिवसांमध्ये तुझ्यात आणि माझ्यात किती अंतर, किती वेगळेपणा निर्माण झालाय.

वाटत होतं जोरात सांगावं -नाही, मी पूर्वीसारखीच मुक्त आहे, स्वतंत्र आहे. तुम्हाला वगळता कोणाबद्दलही एक तीळभराची चिंता मला आजपर्यंत वाटली नाही. परंतु लाजेमुळे मी काही सांगू शकले नाही.

खूप वेळ गेला. ते काही बोलले नाहीत. बाहेर हा पाऊस आणि वादळ आणि आता जवळजवळ बसलेले ते आणि मी. भीती वाटली, जर त्यांनी मला आपल्याजवळ झोपायला बोलावलं तर काय करीन मी इथं? आणखी काही मार्गही दिसत नाही. भीतीने माझी छाती आतून धडधडू लागली.

खूप वेळानंतर ते म्हणाले, 'चल, तू झोप इथं सती, मी जातो आहे.

निश्चिंत होवून विचारलं, 'आणि तुम्ही कुठं झोपणार आहात मग, दुसऱ्या खोलीत?

'मी? माझं काय घेवून बसलीस, इथंच कुठं तरी व्हरांड्यात पडून राहीन. आणि काही तासाचाच तर प्रश्न आहे.

ही हवा, हा पाऊस आणि थंडी, त्यात उघड्या व्हरांड्यात! क्षणभरात सारी भीती आणि शंकाकुशंका बाजूला झाल्या, आणि म्हणून गेले, 'नाही नाही, असं होणार नाही. अशा पावसात बाहेर जावून झोपणार? तापेला निमंत्रण द्यायचंय् का? तुम्ही इथंच झोपा.'

'आणि तू? अंथरूण तर केवळ एकच आहे ना.'

त्यांच्या आवाजात आता कंप होता.

म्हणाले, 'मी बाहेर जाईन.

ते हसले. ते सगळंच हसणं नैराश्यानं झाकळून गेलेलं होतं. म्हणाले, 'नाही ग वेडे, मी व्हरांड्यात झोपेन, तू झोप इथंच.' मग खोलीचा दरवाजा बाहेरून लावून म्हणाले, 'आतून बंद करून झोप. मी जातोय.'

वाटून गेलं, मी इथं खोलीत अंथरूणावर निश्चिंत होऊन झोपायचं आणि ते बाहेर कुठं तरी मोकळ्या जागेत, वादळ-पावसात असेच पडून राहणार ना रात्रभर!

पायानं अंथरूण लोटून देऊन ओल्या जमिनीवर मी लोळागोळा होऊन पडले. आणि त्याच वेळी बाहेर माझ्या अंतःकरणाच्या वेदनेची थट्टा करीत वादळ गर्जत होतं!

सकाळी जाग येण्याच्या आधीच नाथभैय्यानं येऊन हाक दिली. सटपटून उठून बसले. डोक्यावर पदर घेतला. त्यांनी विचारलं, 'अंथरूण सोडून रात्रभर अशीच जमिनीवर झोपली होतीस ना?'

म्हणाले, 'स्वत: कोणत्या बाजे-पलंगावर झोपला होतात ते सांगता?'

समाधानानं त्यांचा चेहरा उजळून निघाला. ते म्हणाले, 'बरं चल, लवकर दात घास आता. पालखी आली नाही अजून. मी पाहतो काय ते.'

ते बाहेर गेले. थोड्या वेळानं माघारी येऊन म्हणाले, 'सती, पालखी तर कुठं मिळाली नाही. एक बैलगाडी आणली आहे. काय करायचं -जाशील त्यातून?'

खरं म्हणजे यांना किती चिंता आहे माझी. म्हणाले, 'हो, जाईन की त्यातून.'

नाथभैय्याबरोबर बाहेर आले. नदी ओलांडून त्या गाडीत जाऊन बसले. माझ्यापुढे गाडीत बसत नाथभैया गाडीवानाला म्हणाले, 'चला, हाका.'

गाडीवानाने विचारले, 'कुठं जायचं बाबूजी?'

नरहरी मिश्र यांच्या घरी.'

अजून उनं पडलेलं नव्हतं. रात्रीच्या पावसामुळे ठिकठिकाणी पाणी जमा झालेलं होतं. जणू सृष्टी आपले सकाळचे स्नान आटोपून ओल्या कपड्यांमध्ये उभी होती. आणि झाडांच्या पानांचे निळे वस्त्र ओढून नेसण्याचा प्रयत्न करीत होती. नाथभैया गाडीत जरी बसलेले होते तरी त्यांचे लक्ष आजुबाजूकडे लागलेले होते. चेहऱ्यावर रात्रीसारखं हसू आता उरलेलं नाही. त्यांच्याकडेच एकटक पाहात विचार करीत होते -आणखी काही वेळानंतर ही भेटही संपून जाईल. परत किती दिवस भेट होणार नाही कुणास ठाऊक! इतक्या सगळ्या दु:खात केवळ कालच्या रात्रीचे सुख तेवढे माझ्या जवळचे धन होते. दु:खाच्या क्षणी मनाची समजावणी करण्यासाठी हाच एक अमूल्यनिधी आता माझ्या हृदयसंपुटात साठून राहिला होता.

समोर पसरलेल्या अनोळखी रस्त्यावरून गाडी जात होती. शेतांमधल्या काढायला आलेल्या साळीच्या रांगा पावसामुळे तृप्त आणि पिवळ्या जर्द दिसत होत्या. वाटत होते की, हळद लाऊन जणू-सासरीच निघाली होती ती, आणि सकाळचा वारा तिचा सुगंध घेऊन वराचे अभिनंदन करायला निघाला होता! पोहचेपर्यंत चारी दिशांनी चांगलं उन पसरलं होतं. ओट्यावर माझे यजमान बसलेले होते. गाडी थांबलेली पाहताच विचारलं, 'कोणाची गाडी आहे?'

नाथभैया गाडीतून उतरून मला म्हणाले, 'सती! तू इथंच बसून राहा. मी आत जाऊन सांगून येतो.'

नाथभैयानं माझ्या यजमानांच्या जवळ जाऊन हळू आवाजात काहीतरी सांगितलं. तट्टयाच्या फटीतून मी तिकडंच पाहात होते. त्यांचं म्हणणं ऐकल्यावर माझे यजमान संतापानं फणफणत

म्हणाले, 'या घराला काय बावन्नखणी करायचय का? आणि परत तोंड दाखवायला आलीय् बेशरम. शहरात पुष्कळ गल्ल्या आहेत वेश्यांच्या, घेऊन जा तिथंच हिला. मी तिचं तोंडसुध्दा पाहणार नाही.'

नाथभैया दु:खित होऊन म्हणाले, 'आपण हे काय हलक्या लोकांसारखं बोलताहात? जरा विचार करून बोला.'

ते संतापानं गरजले, 'काय म्हणालात हलके लोक? हलका माणूस मी आहे की ती? मंदिरात जाणूनबुजून मागे राहिली होती ती. कोणत्या याराबरोबर रात्र काढायची होती ते जरा मलाही ऐकून द्या ना? सकाळी आलीय मोठी सभ्य बनून. नाही, मी मूर्ख नाही. मला सगळं समजतंय. तिनं आताच्या आता माझ्या डोळ्यासमोरून निघून जाण्यातच भले होणार आहे. नाही तर नोकरांना बोलावून धक्के देऊन इथून हाकलून देईन.'

हे सगळं ऐकणं कठीण होतं. प्रेतवत गाडीत पडून राहिले. वाटले, सासुबाईंना या सगळ्या गोष्टी नसतील का ऐकायला जात? परंतु माझा हा सहाराही क्षणभरात माझ्या डोळ्यासमोरून अदृश्य झाला! त्या तर कालपासूनच इथे नाहीत.
हेच का माझे यजमान! यांच्यासाठीच तर रात्री स्वत:ला दुसऱ्यापासून अस्पर्शित ठेवण्यासाठी धडपडण्यात नीटशी झोप आली नव्हती! नाथभैया गाडीजवळ येऊन गाडीवानाला म्हणाले, 'चल हाक.'

त्यांचा संताप पाहून बिचारा गाडीवान घाबरून गेला होता. त्यानं भीत भीत विचारलं, कुठं साहेब?'

'रेल्वे स्टेशन.'

o o o

या चालत्या गाडीत बसून मी कोणत्या अनोळखी मार्गाची प्रवासिनी झाले होते कोणास ठाऊक. कोठे जाते आहे, काय करणार आहे -काही काही माहीत नाही. दोन दिवसांपूर्वी काय होते, आणि आज काय झाले आहे. वाटतेय की मधल्या काळात एक युग, एक जन्म गेला आहे. क्षणभराच्या थोडीशा चुकीमुळे जे कधी स्वप्नातही कल्पिले नव्हते ते सगळेच नशिबानं माझ्या पुढ्यात वाढून ठेवलं होतं. त्यासाठी का कोणी मला तिळभर तरी क्षमा केली होती? समाजाच्या दृष्टीने स्त्रीला तिच्या पतीकडून मिळालेली सर्वात मोठी शिक्षा जी असते ती मला किती लवकर मिळाली होती? थोडाही विरोध कुणी केला नाही. सगळंच सोपं होतं जणू. आणि दुसरीकडे समाजाचं मस्तिष्क बनून राहिलेला पुरुषवर्ग मात्र हजार पटीने अधिक मोठे गुन्हे रोज असंख्य वेळा करीत आलेला होता. परंतु त्यांच्या विरुध्द तोंड उघडण्याचा अधिकार कोणाला नाही. वाटले, सगळ्यात हिणकस, दुर्दैवी जर कोणी असेल तर आमची ही स्त्रीच जात आहे. यौवनाचा शेवाळी रस्ता पार करताना जणू कुठे तिथे पाय घसरतात की काय ते पाहण्यासाठीच हा समाज हजारो डोळे वटारून पाहात बसला आहे! काही दिसलेच तर वाचणं अवघड आहे. एवढेच नाही तर त्यासाठी फाशीचीही व्यवस्था केली जाते!

परंतु हे पुरुष, जाऊ द्या झालं या गोष्टी.

जेव्हा बैलगाडी स्टेशनावर पोचली तेव्हा रेल्वे येण्याची वेळ झालेलीच होती. नाथभैयानं मला आत नेलं. थोड्याच वेळानं धाडधाड आवाज करीत आणि जमिनीचा थराथराट करीत हवेच्या वेगाने एक काळी गाडी धूर आणि धूळमिश्रित धुकं सर्वत्र पसरवीत येऊन उभी राहिली. असं वाटलं की जणू एखाद्या कथामालिकेतील राजाच्या हरवलेल्या मुलीच्या शोधार्थ एखादा राक्षस धावत निघालेला आहे. लोकांची गर्दी आणि आरडाओरड्यात आम्हीही एका डब्यात जाऊन बसलो. गाडी सुरू झाली. खेड्यातल्या लोकांना काय माहीत की बाहेरच्या जगात इतक्या नव्या नव्या आणि न पाहिलेल्या अनेक गोष्टीही आहेत! मला तर सारेच स्वप्नवत वाटत होते.

एका छोट्याशा घरासमोर बग्गी येऊन थांबली. मी आश्चर्याने विचारलं, 'हे कोणतं ठिकाण आहे नाथभैया?'

ते म्हणाले, 'हेच तर कटक आहे!'

मला काय माहीत की इथं यायचंय म्हणून? विचारलं, 'गावाकडे जायचं आहे ना?'

'हो. जायचं तर आहे, पण आज नाही' ते म्हणाले.

आम्ही ज्या घरात राहायला गेलो तिथली एक खोली स्वच्छ करून घेऊन नाथभैया मला म्हणाले, 'सती तू या खोलीत बैस. मी आत्ता येतो.'

'मी इथं एकटी राहू की काय?'

'नाही ग वेडे! या घरात आणखी एक माणूस राहतो. तुला भीती कशाची आहे? मी तर त्वरित परत येतोय' ते बाहेर निघून गेले. खोलीत शांत बसून मी विश्व ब्रम्हांडाचे चिंतन करू लागले. आज अत्ता काही तासांपूर्वी माझ्या संदर्भात जी दुःखद घटना घडली होती तिची कल्पनाही नसेल माझ्या आईवडिलांना आणि इतर लोकांना! गावातही कोणी ऐकलं नसेल! परंतु आज नाही उद्या तर कळेलच की! एका छोट्या चुकीसाठी माझ्या यजमानांनी मला घराबाहेर कसं घालविलं ते कळेल! आणि त्यांना शरण जाण्याच्या ऐवजी मीही कोणत्या गर्वानं फुलून इथं निघून आले! आणि आले निघून कोणाबरोबर तर ज्यांच्याशी लग्नापूर्वी काही महिने माझं बोलणं बंद होतं त्या नाथभैयाबरोबर! छे छे, आता आईला वडिलांना मी तोंड तरी कसं दाखवू शकणार होते? त्या दिवशी त्या मंदिराच्या गर्दीमध्येच का नाही मरून गेले मी? गावातले लोक जेव्हा माझ्या वडिलांना विचारतील की तुमच्या मुलीला सासरच्या लोकांनी का हाकलून दिलं तर काय उत्तर देतील ते? माझ्यामुळेच त्या सगळ्यांना माना खाली घालाव्या लागतील! परंतु हे सगळं कोणामुळं झालं -याच नाथभैयामुळे ना! यांच्यामुळेच तर मी माझ्या यजमानांबरोबर दरवाजात भांडण केले नव्हते! हेच तर होते ना माझ्या बाजूने बोलण्यासाठी! जर माझे यजमान नाराज होते तर यांना नम्रतेनं बोलता येत नव्हतं का? मला घरात प्रवेश मिळवून देण्यासाठी यांनी पाय का नाही धरले? त्यानंतर त्या घरात मी कशी राहिले असते ते मला माहीत आहे. आजपर्यंत यजमानांच्या अंथरूणाला स्पर्श न करता दिवस काढले, आणखी काही दिवस असेच निघून गेले असते! माझ्या दुःखामुळे यांचे डोके काय

म्हणून एवढे दुखते? स्वाभिमान दाखवण्याच्या प्रयत्नात जी चूक केली आहे ती आता आयुष्यभर सुधारता येणार नाही.

दरवाजा उघडण्याचा आवाज झाला म्हणून तिकडे पाहिले - नाथभैया होते! खूपसे सामान एका मोठ्या टोपलीत ठेऊन एका माणसाने ते खोलीत आणून ठेवले. नाथभैयानं हसत हसन हाक मारली, 'सती!'

मी रागातच. काही बोलले नाही.

मला गप्प बघून ते म्हणाले, 'सर्व खरेदी करून आणलंय सती. घर संसाराला लागणारं सर्व सामान.'

वेदनेनं त्यांचा चेहरा क्षणात कोमेजून गेला. जवळ येऊन माझ्या पाठीवर हात ठेवून त्यांनी हाक दिली, 'सती!'

'का रडतेस? मला नाही का सांगणार?'

खोटंनाटंच सांगितलं, 'डोकं फार दुखतंय.'
थोडावेळ तिथंच उभं राहून ते विचार करीत राहिले. त्यानंतर मात्र ते त्या उन्हातच चटकन् बाहेर पडले. जातांना त्यांचा पाय त्या टोपलीला लागला आणि गाडगी, मडकी आणि कित्येक बाटल्या फुटून गेल्या. परंतु त्यांनी थांबून पाहिलंही नाही. मिनिटही उलटला नव्हता तर तेवढ्यात ते एक डबी घेऊन परतही आले. म्हणाले, 'यातलं थोडं औषध डोक्याला लावतो. आता थांबेल.' खोटं बोलले होते, तरी औषध लाऊन घ्यावं लागलं. त्यानंतर त्यांनी मला जबरदस्ती झोपवलं आणि पंखा ढाळू लागले. मी शांतपणे अंथरूणावर पडून राहिले. दोन्ही डोळे अश्रूंनी टचकन भरून आले.

काही वेळा पूर्वीच तर यांच्याबद्दल माझ्या मनात राग दाटून आला होता ना!

मला उठताना पाहून ते म्हणाले, 'ठीक आहे ना?' म्हणाले, 'हो, थांबलय्.'

पुन्हा पूर्वीप्रमाणेच हसत हसत ते माझ्याशी घरसंसाराच्या गप्पा करू लागले. म्हणाले, 'घाईत पाय लागून या सगळ्या वस्तू फुटल्या. असं वाटतंय की बाजारातून पुन्हा एकदा आणाव्या लागतील.' ते म्हणाले, 'काय करायचेत इतके गाडगे? एवढ्यावर नाही का भागणार.'

'भागेल? तर मग ठीक आहे. हो, पण आता या वेळी बाजारात स्वयंपाकी नाही मिळणार. पैसे देऊनही. जोपर्यंत काही व्यवस्था होत नाही....' पुढे कुणास ठाऊक ते गप्प बसले.

मी म्हणाले, 'काय करायचाय स्वयंपाकी? मी काय दोघांचा स्वयंपाक नाही करू शकणार?

ते हसले. म्हणाले, 'तुझ्या हातचं खाण्याच्या अभिलाषेमुळेच तर नीटपणे स्वयंपाकी नाही पाहिला. परंतु फक्त हे या वेळेपुरतंच बरं. यानंतर परमेश्वरानं अशी दुर्बुध्दी घालू नये म्हणजे झालं.' दोघेही हसलो.

त्याच दुपारी थोडंबहुत खाऊन नाथ भैया स्वयंपाक्याच्या शोधात जे गेले ते इतका वेळ झाला तरी अजून आले नव्हते. आज आमच्याकडे जी नवी मोलकरीण आली होती तिला तीनचार वेळ पाहायला पाठवूनही ते आलेले नव्हते. वाटले किती वेळ लागेल त्यांना यायला कुणास ठाऊक. चुलीत दुपारचा अग्नी पेटता होता. त्यात एक मूठभर भुसा टाकून त्याच खोलीत भाजी चिरायला बसले, तर एक बाई दरवाजात येऊन उभी राहिली. चेहऱ्यावरून कुठल्यातरी खानदानी घराण्यातील वाटत होती ती. वयही माझ्यापेक्षा काही अधिक नव्हतं. ही कोण आहे बरं - मी ओळखत नाही. मी काही बोलले नाही. काही वेळ असाच गेला. बोलण्याचा प्रारंभ तिनेच केला, 'मी इथंच दुसऱ्याच अंगणात राहते. आमचे 'हे' कलट्टरीमध्ये काम करतात. दोन वर्षांपासून आम्ही इथेच राहतो.' यांच्याबद्दलच सकाळी नाथभैया म्हणत होते वाटतं! म्हणाले, 'बसा'.

त्या बसल्या. म्हणाल्या, 'मला बसायला फुरसत आहे कुठं! आज महिन्याचा शेवटचा शनिवार असल्याने ह्यांना कचेरीतून यायला वेळ लागेल, नाही तर यावेळी क्षणभराची फुरसत मिळत नाही मला.'

मी विचारलं, 'तुम्ही एकट्याच राहताय की काय?'

तिनं आश्चर्यानं सांगितलं, 'होय, आणि मग राहणार कोण माझ्याबरोबर! पाच वर्षांनंतर परमेश्वरानं कूस उजविली होती परंतु तीही उजाड झाली. त्या दिवसापासून हे कचेरीला गेल्यानंतर नेहमीच एकटीच राहते.'

दुःख आणि वेदनेमुळे तिचं शेवटचं वाक्य ओथंबून आलं होतं. मग काही वेळापर्यंत ती गप्प बसली. वाटलं, कदाचित् मुलाच्या आठवणीनं तिला रडू येत आहे.

काही वेळा नंतर सहजपणे तिने विचारले, 'या घरात आजच आल्या आहात ना!'

म्हणाले, 'हो!'

'यापूर्वी कुठं होता?'

'खेड्यात.'

काही वेळापर्यंत ती काहीतरी विचार करीत राहिली, आणि मग एकाएकी तिनं विचारलं, 'तुमचे हेही कचेरीतच काम करतात ना!'

तिचं बोलणं ऐकून लाजेनं अर्धमेली झाली. थोडं हसून मान खाली घातली.

ती हसली, 'सांगा ना? लाज वाटतेय का! मलाही पूर्वी त्यांच्या गोष्टी निघाल्या की अशीच लाज वाटायची. पण मी तर शेजारीण आहे. घराला घर लागून आहे. माझ्या समोर बोलायची लाज कसली?' होकार भरणं आवश्यकच होतं. म्हणाले, 'नाही.'

'तर काय व्यापार वगैरे करतात?'

'नाही, काही नाही.

माझं बोलणं ऐकून ती चकितच झाली. मग विचारलं, तर मग काय करतात ते कटकमध्ये?

'फिरायला आले आहेत. मी कसं तरी सांगितलं.

'फिरायला आले आहेत' आश्चर्यातिरेकाने मोठे मोठे डोळे करून त्यांनी विचारलं, केवळ फिरायला आले आहेत? बरोबर बायकोला घेवून, तर मग नक्कीच तुम्ही कोणीतरी मोठी आसामी आहात. मोठे जमीनदार वगैरे असेल नाही का?

नाथभैय्याच्या संदर्भात असे अपमानाचे प्रसंग आल्यामुळे मला कसेतरीच वाटत होते. केवळ वेळ निभावून नेण्यासाठी म्हणाले, 'हो, जमीनदार आहेत.

यानंतर कदाचित् ती विचारू इच्छित होती की, ते कोणत्या गावात जमीनदारी आहेत, किती जमीनदार आहे इत्यादी. अगदी त्याचवेळी बाहेर वाहणांचा आवाज आला आणि ती चटकन उठून म्हणाली, 'आता चलते, परत कधी येईन.

'ठीक आहे.' इतकं म्हणाले की स्वयंपाकघराच्या दारात नाथभैय्या येवून उभे राहिले. म्हणाले, 'रस्त्यात विचार केला तेच झाले नेमके. विचार करीत होतो की, आता आमची अन्नपुर्णा कामकाजात गुंतली असेल. त्यानंतर उंबऱ्यात बसून म्हणाले, 'काय करू सती, स्वयंपाकी अजून मिळाला नाही.

'म्हणाले, 'काम तर चालतं आहे.

'चालतं तर आहे, पण एखाद्या स्वयंपाक्याची गरज आहेच. तुला या सगळ्या बाबीची सवय थोडीच आहे?

'गावात तर नेहमीच मी स्वयंपाक करीत होते. मी म्हणाले.

'आता ते दिवस कुठे राहिलेत? थोडसं उन लागलं आज तर डोकं दुखू लागलय. जमीनदाराच्या घरची सून होतीस तू. काही असो की नसो स्वयंपाक तर नव्हता बनवावा लागत 'सासरी.

काही उत्तर दिलं नाही मी. इतकी सगळी सुखं असूनही या जुन्या गोष्टींनी अंतःकरणाला तीव्र वेदना झाल्या. शांतपणे खाली पाहात भाजी चिरू लागले. तेही असं बोलून जणू आपल्यातच हरवून गेले. थोडा वेळपर्यंत कोणी काही बोललं नाही. त्यानंतर मी म्हणाले, 'जा, कपडे बदलून घ्या. स्वयंपाक तयार आहे.

'हो, जातोय, 'असं म्हणत ते आपल्या खोलीत निघून गेले.

रात्री जेवणी खाणी झाल्यावर मोलकरणीनं साफसफाई केली व भांडी घासली आणि घरी जातांना अंगणातलं दार लोटून म्हणाली, 'कवाड लावून घ्यावा, नाही तर कुतरं घुसून भांडेकुंडे उष्टे करील.

दिवा घेवून दार बंद करायला जातच होते तर पाहिलं की नाथभैय्या दार बंद करून परतत होते, मला पाहून म्हणाले, 'या थंडीत उठून इतक्या दूर येण्याचं कुणी सांगितलय तुला?

त्यांचं बोलणं ऐकून हसू आलं मला.

म्हणाले, 'तुम्हाला कुणी सांगितलं होतं, हे तरी जरा सांगा बरं?

ते खदखदून हसत म्हणाले, 'बर बरं जा, जावून झोप. आतून दरवाजा बंद करून घे. शहरामध्ये चोरांची फार भिती असते.

'चोरांची भीती? आश्चर्यानं विचारलं.

'हो, मग एकट्याला झोपायला काय भिती वाटते?

घाईघाईनं म्हणाले, 'मला भीती नाही वाटत.

अंथरूणावर पडल्या पडल्या विचार केला -

माझ्यामुळेच यांना रात्रंदिवस झोप येत नाही आणि मी मात्र यांच्याबद्दल सर्व भीती आणि संशय बाळगते. छे छे, स्त्रियांची जात नेहमीच इतकी बेईमान आहे?

त्या दिवशी घराबाहेर दूर दूर पर्यंत घनदाट धुके पसरले होते. असं वाटत होते की, जणू हिम म्हातारीनं आपली मळकट रंगाची साडी स्वर्गाच्या अंगणातल्या उन्हात टाकली होती. त्या दिवशी सकाळी उठून भैय्या कुठं तरी जाणार होते.

विचारलं तेव्हा म्हणाले, 'तासभरात परत येईन.

स्वयंपाकासाठी तांदूळ वगैरे काढायला निघाले तर मोलकरणीनं येवून म्हटलं, 'मला द्या मालकीन बाई, मी स्वयंपाकाची सारी व्यवस्था करते, तुम्ही फक्त मुलीजवळ बसा.

विचारलं, 'का?

ती म्हणाली, 'एका दिवशी मालकानचं मला बोलावून सांगितलं की, तुला काही जास्त पैसे देऊ पण स्वयंपाकाची सारी व्यवस्था तू पाहा. म्हणजे केवळ स्वयंपाक बनविण्याचं तेवढं काम तिला करावं लागेल.

उत्सुकता वाढली म्हणून म्हणाले, 'खरं?

'सकाळी सकाळी तुमच्याशी काय खोटं बोलायचं सुनबाई? न जाणो कोणत्या पापामुळे सारा वंश खावून बसले मी. त्यात परत कशाला खोटं बोलेन मी.

'आणखी काही म्हणाले की एवढचं?

'त्यांनी जे काही म्हटलं ते योग्यच म्हटलं ना? बालपणापासूनच सुखात वाढलेल्या तुम्ही, स्वयंपाकाचा त्रास होणारच की तुम्हाला? परंतु काय करणार? हे खेडेगाव तर नाही ना की जेथे

हुकूम सोडला की म्हणावेत तेवढे स्वयंपाकी हजर होतील. मालकीनबाई हे तर कटक शहर आहे. इथं पैसा देवूनही एखादेवेळी स्वयंपाक्याशिवाय इथल्या लोकांना उपाशी झोपावं लागतं. मी मालकांना म्हटलं....'

'काय म्हटलं? मी विचारलं.

'म्हटलं, असंच आहे तर गावाकडे का नाही निघून जात. इतका त्रास का करून घेता?'

'काय म्हणाले मग ते?'

'म्हणाले, काम पूर्ण झाल्याशिवाय कसं जाता येईल.

हे ऐकून मन एक प्रकारच्या उदासिनतेनं भरून गेलं. गावाकडे जाण्याच्या संदर्भात मीही नाथभैय्याला एकदोनदा म्हणाले होते. ऐकून त्यांचा चेहरा कोमेजून जात असे. ऐकून न ऐकल्यासारखं करून ते माझं म्हणणं टाळत असत आणि तिसरचं बोलणं काढतं असत. एक कुशंका माझ्या मनात चमकून गेली. ती जाणीव कष्टानं मनातून काढून टाकीत कामात व्यग्र होवून जाण्याचा प्रयत्न करीत असत.

दरवाजात पावलं वाजली. पाहिलं, दारात तीच शेजारीण उभी होती. तिच्याकडेच मी पाहतेय असं पाहून ती खोलीत येवून म्हणाली, 'का हो. काय चाललंय?

म्हणाले, 'काही नाही. बसा.

'नाही हो ताई. मला बसायला वेळ कुठं आहे? साहेबाकडे काही कामं होतं म्हणून आमचे हे सकाळी सकाळीच बाहेर पडलेत. काही काम नव्हतं. म्हटलं, चला जरा फिरून येऊ. तुमच्याकडंही सगळं सुनसान आहे.'

म्हणाले, हां.

'कुठं गेले आहेत? स्वयंपाकी शोधायला वाटतं?

वा, काय नवरा मिळालय बाई तुम्हाला. घरात काय आहे, काय नाही याची थोडीसुध्दा चिंता घरातल्या स्त्रीला करावी लागत नाही. उन्हातान्हाची पर्वा न करता घरसंसाराच्या कामाला जुंपून घेतलंय. आणखी काय पाहिजे? मला जर असा नवरा मिळाला असता ना ताई, तर खरं सांगते माझे पाय जमीनीवर ठरले नसते.

तिने असं म्हटलं खरं परंतु तिला काय माहित की, हे माझे यजमान नाहीत. तरीही आपल्या यजमानाची स्तुती ऐकून उर भरून येतो, त्यापेक्षा काही कमी उरू भरून आला हे ऐकून असं मात्र नाही. सुखानं मन भरून गेलं. माझ्याही नकळत माझ्या तोंडातून निघून गेलं, 'माझं सौभाग्य आहे.' काही वेळानंतर काय वाटून कुणास ठाऊक विचारलं, काय तुम्ही आपल्या गावी जात नाहीत? नेहमी इथंच राहता? ती म्हणाली, 'कोणासाठी जाऊ? ज्यांच्यासाठी सासरी जायचं ते तर नेहमी इथंच असतात. सासरी अजून कोणी आहे का? एकटी म्हातारी सासू आहे. वर्ष सहा

महिन्यानी ती इथं येते आणि दहा पंधरा दिवस राहून जात असते.

'आणि माहेरी?' मी विचारलं. एक दीर्घ श्वास सोडून ती म्हणाली, 'हो, तो दरवाजा तर माझ्यासाठी केव्हाचा बंद आहे. मी पाच वर्षाची असतांनाच वडील वारले होते. केवळ आई होती. तर तीही बिचारी दोन वर्षापूर्वी पटकीमध्ये या जंजाळातून सुटली.'

एका अज्ञात भीतीने मन व्याकूळ होऊन गेले. फार दिवस झाले. घराकडची काही बातमी आली नव्हती. नाथभैय्यानंही कसं त्यांच्याबद्दल काही सांगितलं नाही? एका अज्ञात संकटाच्या कल्पित शंकेमुळेच केवळ अस्वस्थ झाले आणि गावाकडे धाव घेऊ लागले. वाटायला लागलाय् की घरच्या लोकांचे चेहेरे पाहून, कित्येक युगे लोटली आहेत. आणखी थोडा वेळ बसून ती स्त्री निघून गेली. मला एकटीला भावनांच्या अथांग सागरात लोटूनच जणू मनातल्या मनात विचार केला, येवू दे त्यांना मग गावाकडे जायची गोष्ट नक्कीच काढीन. नाही तर पाय धरून विनंती करीन. ते काय माझं थोडसंही ऐकणार नाहीत? इतके का कठोर झालेत ते?

दुपारच्या वेळी नाथभैय्या व्हारांड्यात बसून जेवत होते, जवळ बसून पंख्यानं वारं घालीत, सगळं ध्यैर्य एकवटून म्हणाले, 'अजून किती दिवस इथं राहायचय्. गावाकडे जायचं नाही का? माझ्या चेहऱ्याकडे पाहात ते म्हणाले, 'इथल्या वातावरणाला कंटाळीस ना. त्यातच पुन्हा दोन्ही वेळेचा स्वयंपाक, खूपम थकतेस, हो ना.

मी म्हणाले, असं नाही. स्वयंपाक करण्यात मला काही त्रास होतोय असं नाही. फक्त?

'काय फक्त?

'फार दिवस झाले, गावी गेलेच नाही.

एकाएकी गंभीर होत ते म्हणाले, 'हां. ते मला समजतंच की. आणि त्यातच इथलं सगळं काम तुलाच करावं लागतं इतक्या थंडीत. तेही डोळे झाकून सहन करतो आहे. पण काय करू आल्या दिवसापासून स्वयंपाकी शोधण्यासाठी बाजारात जातोय.

त्यांच्या याच शब्दामुळे मला गावाकडे जाण्यासाठी शब्द टाकण्याला आधार मिळाला. म्हणाले, 'गावाकडे इतकी अडचण कधी होत नाही. कमीत कमी स्वयंपाकाची तरी एवढी चिंता करावी लागत नाही.

ते हसले. हे हसणं मात्र शुष्क आणि उसणं होतं. पण काही बोलले नाहीत. हट्ट धरून मी म्हणाले, 'नाही नाही, आजच गावाकडे निघालं पाहिजे. 'आज? ते परत हसले. आज आता कसं जाता येईल?

तर मग कधी? 'कधी? आणखी एक महिन्याने जाऊ.

मनातल्या मनात मला ज्या गोष्टीची भीती वाटत होती नेमकी तीच गोष्ट घडली नव्हती? त्याशिवाय विनाकारण मला कटकमध्ये थांबवून ठेवण्याचे कारणच काय? परंतु मला सगळं काही

समजले आता क्षणभरही येथे थांबायला माझे मन तयार नव्हते. मी जाणार. मग माझ्या गावी जाईन किंवा आणखी कुठे-पण जाईन. यांच्या मोहक बोलण्यामध्ये अडकून पडून माझे पाप आणखी वाढविण्याची आता इच्छा नाही.

थोडी कठोर होऊन म्हणाले, 'मला इथं असं थांबवून ठेवण्याचं कारण तरी काय, ते तरी मला कळू द्या जरा? माझं मन तर क्षणभरही थांबायला तयार नाही? नाही, आज तुम्ही मला घेऊन चला, आत्ताच. नाही तर मी काही खाणारच नाही. अशीच झोपी जाईन, ध्यानात घ्या.'

माझं बोलणं ऐकून दु:खानं त्यांचा चेहरा काळा ठिक्कर पडला. फक्त ते इतकंच म्हणाले, 'मी माझ्या सुखासाठी तुलां इथं ठेवलंय असं वाटतंय की काय, सती? तुला काही माहीत नाही.'

मनात येऊ लागलं होतं ओरडून म्हणावं, 'होय रे बाबा, मला सगळं कळलंय, आणि हेही कळलंय की तू त्या दिवशी मंदिराकडे का आला होतास ते, मी परतल्यानंतर माझे यजमान चिडून उठले तेव्हा तू माफी का मागितली नाहीस ते, का संतापून तिथून चटकन् निघालास तेही. पंधरा दिवसांपासून गावाकडे न जाता कटकमध्ये मला का ठेवलंस तेही समजलंय मला पण तोंड उघडून केवळ इतकंच म्हणाले, 'मला काहीही माहिती करून घ्यायची गरज नाही. तुम्ही मला गावाकडे नेऊन सोडा, बस.'

माझे शब्द ऐकून त्यांच्या चेहऱ्यावरचा उरला सुरला सगळा लालिमाच नष्ट झाला. म्हणाले, 'मुलासारखं असं नादान बनल्यावर मी काय करू शकतो सांग बरं? कदाचित या जगातली हीच एकमेव गोष्ट असेल की, जीवात जीव असेपर्यंत ती तुला सांगायची नाही, असे ठरवून टाकले आहे. आणि सांगितलं तर तू नाही सहन करू शकणार.'

आतापर्यंत ज्या बाबींची केवळ शंका येत होती, त्यांचं ते बोलणं ऐकून खात्रीच पटली. अधीर होऊन रडत विचारलं, 'नाही, नाही. सांगा तुम्ही.'

मला रडताना पाहून त्यांचे दोन्ही डोळे अश्रूंनी डबडबले. अतिशय कष्टानं म्हणाले, 'ठीक आहे. सांगेन, पण आता नाही. तू पहिल्यांदा खाऊन पिऊन घे. त्यानंतर सांगेन. तुझी शपथ, नक्कीच सांगेन.'

हट्ट करीत म्हणाले, 'नाही, अत्ताच सांगा.'

ते म्हणाले, 'तुझी शपथ खाल्लीय मी, तरीही तुला विश्वास वाटत नाही? माझं ऐकतेस ना तू. जा, नंतर सांगेन.'

o o o

माझा सारा दिवस भीती आणि भावनोद्रेकात गेला. कामाधामात बिल्कूलही मन लागत नव्हते. नाथभैयांच्या हे लक्षात आल्यामुळे ते माझ्याकडे एकटक पाहात होते. विचार केला, कदाचित, मला टाळण्याचा विचार करीत असतील.

परंतु सकाळी तर माझी शपथ खाल्लीय सगळं सांगेन म्हणून.

संध्याकाळी मोलकरीण येऊन म्हणाली, 'दिवस बुडाला न मालकीनबाई, अजूनपर्यंत चूल पेटली नाही. स्वयंपाक कधी होणार?'

म्हणाले, 'आज जेवणार नाही?'

'आता काय म्हणावं बाई, अहो तुम्ही नाही खाणार तर काय मालकही तुमच्यासाठी उपाशीच राहणार की काय?'

म्हणाले, 'चल, आत जाऊन भाजी चिरून ठेव, मी आलेच.'

नाथ भैया फार वेळापासून घरी नव्हते. त्यांच्यासाठी फराळ करता करता मी अस्वस्थ होऊन गेले. आज मला सगळ्या गोष्टी सांगणार आहेत असं तर म्हणालेत ते.

अर्ध्या तासानंतर ते आले. वहाणा खोलीत जाऊन त्यांनी उजेड केला. मी लवकर लवकर स्वयंपाकाचे काम आटोपून त्यांच्याजवळ गेले. माझ्या पावलांचा आवाज ऐकून त्यांनी पाहिलं, विचारलं, 'कोण सती का?'

हे काय, यांचा चेहरा असा सुकून का गेलाय? दोन्ही डोळ्यांमध्ये उदासिनता भरून राहिली होती. परंतु त्या दिवशी कोणती कुबुध्दी झाली होती कुणास ठाऊक, पण त्यांच्याविषयी मला मुळीसुध्दा सहानुभूती वाटली नाही. त्यांच्या प्रकृतीबद्दल विचारलं नाही. जणू माझी जीभच कोणी छाटली होती.

त्यांनी बोलावलं, 'ये आत. आज तू ऐकल्याशिवाय सोडणारच नाहीस ना? वाटलं होतं, काही दिवसानंतर हळू हळू आपोआपच कळेल सारं तुला. मला सांगण्याचा त्रास सहन करावा लागणार नाही.

माझ्या तोंडून ऐकल्याशिवाय नाही का राहू शकणार तू? ये, बैस इथं.'

मी बाजेवर जाऊन बसले. त्यानंतर ते माझ्याजवळ आले. आणि अतिशय परश्रमाने, दु:खाने थोडं थोडं असं सारं सांगून टाकलं. दोन महिन्यांपूर्वी कशा प्रकारे गावात पटकी पसरली होती, त्यात खूप माणसं मेली होती, शेवटी माझ्या वडिलांना आणि त्यानंतर माझ्या आईला कशी पटकीची लागण लागली, यांनी कटकहून डॉक्टर नेला होता, रात्रंदिवस सेवा केली होती, परंतु सर्व व्यर्थ ठरले होते. शेवटी आधी वडील, त्यानंतर आई कशाप्रकारे हे जग सोडून गेले. त्या दिवशी मंदिरात सगळ्या गोष्टी सांगता आल्या असत्या, परंतु मी त्रस्त होऊ नये यासाठीच सांगता आल्या नव्हत्या. त्या दिवशी माझ्या सासरी अपमान झाल्यावर ते गावी न जाता मला इथं का घेऊन आले होते ते. आई वडील आता नाहीत. अचानक विद्युल्लता चमकून जावी आणि रस्ता चुकलेला प्रवासी चमकून उठावा तसं काहीसं झालं मला. हे सगळं ऐकून माझा जीव हल्लक झाला. माझे वडील, माझी आई आता नाहीत. आता मी त्यांना पाहू नाही शकणार या आयुष्यात. मला रडू आलं नाही. एका प्रचंड शोकाच्या जाणीवेने माझे अश्रू दगड होऊन गेले होते.

सगळ्या संवेदनाच बोथट झाल्या होत्या! माझं डोकं फिरू लागलं, डोळ्यापुढं अंधार येऊ लागला, किती तरी वेळ अंधार तसाच साचून राहिला - किती वेळ कुणास ठाऊक? अंगात थोडं बळ आल्यावर पाहिलं, नाथभैयानं मला आपल्या कुशीत बसवून सांभाळून ठेवलं होतं. माझ्या डोक्यावर हळूहळू हात फिरवीत ते म्हणाले, 'सती, छे छे.'

माझी काय समजूत घालणार ते! ते स्वतःच रडू लागले. त्यावेळी माझी सारी लाज शरम जळून खाक झाली. त्यांचे डोळ्यातले अश्रू पाहून माझ्या डोळ्यातले अश्रू थांबू शकले नाहीत. त्यांच्या छातीवर डोके ठेवून लहान मुलासारखी रडू लागले बेभानपणे. वाटलं, जेव्हा माझी आई मेली असेल तेव्हा अधिर होऊन मला इकडं तिकडं शोधलं असेल. व्याकूळ होऊन अंथरूण चाचपलं असेल. शोधलं असेल मला. परंतु मला पाहू शकली नाही - मरून गेली.

नाथभैया पुन्हा पुन्हा माझे अश्रू पुसत, आपल्या छातीवर माझे डोके ठेऊन शांत बसले होते. आणि बोलणार तरी काय होते? ज्याचं जगातलं सर्वस्वच हरवलंय, त्याला दिलासा तरी कसा देणार?

दोन दिवस तशी अंथरूणावर पडून राहिले. उपाशीतापाशी. खाणंपिणं विसरून नाथभैयाही माझ्याजवळच बसून होते. मला एकटीला सोडून क्षणभरही ते दुसरीकडे कुठे गेले नव्हते. त्यावेळी इतक्या दुःखातही एक गोष्ट मात्र लक्षात येत होती की, नाथ भैया माझ्यावर फार माया करतात.

जगात इतकं प्रेम कोणी कोणावर करीत असेल की नाही, कोणास ठाऊक? मी तर माझ्या आयुष्यात पाहिलं नव्हतं, आणि मी त्यांची कोण लागत होते?

अंथरूणावर पडल्या पडल्या विचार करते, आईवडील मरून गेले, नवऱ्याच्या घरातही मला जागा मिळाली नाही आता, या जगात दम कोंडून जगण्याशिवाय माझ्या जगण्याचा अर्थ तरी काय? परंतु मी मेले नाही. जणू या असहाय जीवनाला यमराज विसरला होता. वाटलं, माझ्यासारख्या दुर्दैवी जीवाला जिवंत ठेऊन परमेश्वराची कोणती मनोकामना पूर्ण होणार आहे!

o o o

त्या दिवशी घरच्या मोलकरणीला - साधवीला माझी काळजी घ्यायला सांगून नाथ भैया कुठं तरी बाहेर गेले होते. पंख्यानं वारा घालीत साधवी म्हणाली, 'मालक केव्हा येतील? आज स्वयंपाक्याचं परत काय होईल कुणास ठाऊक?'

विचारलं, 'का?'

ती म्हणाली, 'तुम्हाला माहीत नाही का की मालकांनी सारं जग पालथं घातलं परंतु स्वयंपाकी मिळाला नाही. तुम्ही तर अशा पडलेल्या, मग त्याबद्दल कळणार तरी कसं?'

संशयानं विचारलं, 'तर मग स्वयंपाकपाण्याचं काय चाललंय?'

ती म्हणाली, 'त्याबद्दल काही विचारू नका मालकीनबाई! मालकांची अवस्था नुसती बघूनच माझी शुध्द जायची वेळ आली. ज्या दिवशीपासून तुम्ही अशा पडलात, दोन

दिवसांपर्यंत तर चुलीवर भांडी चढवली गेली नाहीत.
तुमच्यासाठी दोन्ही वेळचं दूध मात्र बाहेरच्या चुलीवर उकळून देते तेवढंच. आणि माझ्या जेवणासाठी मात्र मालक पैसे देतात.'

आश्चर्यानं विचारलं, 'आणि मालक?'

'ऐका तर खरं, तेच तर सांगतेय. दोन दिवसापासून या डोळ्यांनी पाह्यलं की मालकानं काही खाल्लं पिल्लं नाही. तिसऱ्या दिवशी राहवलंच नाही म्हणाले, 'पाहा ना, काही खाल्लं पिल्लं नसल्यानं चाफ्याच्या फुलासारखं असलेलं शरीर कसं काळं पडलंय! इतके समजदार असूनही तुम्ही जर असं वागू लागलात तर कसं होईल.' ते म्हणाले, 'स्वयंपाकी मिळत नाही, तर मी काय करावं?' तशी मी म्हणाले, 'स्वयंपाकाची सारी तयारी करून देईन मी, तुम्हाला फक्त भांडी चढवण्या -उतरविण्याचे काम तेवढे करावे लागेल.'

'अधिर होऊन विचारलं, 'मग?'

'स्वयंपाक तर तयार झाला, परंतु मोठ्या घरचा मुलगा असल्याने त्यांनी कधी पाहिलंय भांडी कशी असतात ते. ते काय स्वयंपाक करू शकणार मालकीनबाई! दैवच खोटं हो बाईसाहेब, काल रात्री भांडी उतरतांना गरम पेज पडल्याने सगळा हात जळून गेला मालकांचा.'

आतल्या आत शहारा आला. विचारलं, 'मग?'

'त्यामुळे काल सकाळी स्वयंपाकच झाला नाही. कोणास ठाऊक कोणत्या होटला फोटलातून काय मातीदगड खाऊन आले ते त्यांचं त्यांनाच माहीत.'

'आणि त्यातच कटकमध्ये मरीआई पसरलीय मालकीनबाई. त्यामुळे प्रत्येक क्षणी भीती वाटते की कुठं जेवायला जातात, चांगलं असतं की वाईट असतं कोणास ठाऊक?'

पुढे ऐकू शकले नाही. वाटलं, माझ्यासाठीच तर हे एवढं दुःख आणि कष्ट सहन करीत आहेत. केवळ एवढ्यासाठीच ना की मला मुळीसुध्दा त्रास होऊ नये म्हणून! माझ्या शरीरातल्या रक्ताचा कणन् कण समाधानानं संपादित झाला! त्यावेळी त्यांच्या कष्टामुळे मला जे दुःख झाले, त्या दुःखापेक्षाही सुखाची जाणीव अधिक होती.

क्षणभराने पुन्हा संशयाने विचारलं, 'मग आजही हॉटेलातच गेले आहेत का जेवायला?'

साधवी म्हणाली, 'हो. नाही तर दुनिया इकडची तिकडे जरी झाली तरी ते तुमच्याजवळून थोडेच हलतील.'

तासाभरानी ते परतले. रोजच्या सारखंच आजही ते सरळ माझ्या खोलीत आले आणि बाजेजवळ उभे राहिले. माझ्या कपाळावर हात ठेवून म्हणाले, 'सती!'

गडबडीनं उठून बसले. म्हणाले, 'पहिल्यांदा तुमचा हात पाहू द्या बरं?' ते टाळू पहात होते. मी जबरदस्तीनं त्यांचा डावा हात ओढून घेतला. ते पाहून कंप सुटला. पूर्ण हात फोडांनी भरून गेला

होता. त्यातील कित्येकांचे जखमांमध्ये रूपांतर झाले होते. म्हणाले, 'पाहिलंत ना, काय अवस्था झालीय हाताची.' मुलासारखं दुर्लक्ष करीत माझ्याकडे पाहात म्हणाले, 'जळाला आता, मी काय करू?'

गरम पाण्यानं त्यांचा हात धुवून नारळाच्या तेलाची पट्टी बांधली. एखाद्या शांत मुलासारखा त्यांनी हात ठेवला होता. मी विचारलं, 'इथं देवी पसरली आहे ना!'

म्हणाले, 'हो.'

'हॉटेलात जेवायचं कोणी सांगितलं होतं, जरा मला तरी ऐकू द्या?' ते गप्प बसले, जणू कोणाची हत्या करून ते माझ्यापासून लपवीत होते. इतकी भीती! म्हणाले, 'आता या नंतर कधी हॉटेलाफिटेलात गेला तर मी इकडे डोकं आपटून मरून जाईन, ध्यानात घ्या.'

खोलीत बसून आता काय रडायचं? सारं दुःख मनातून निपटून काढून टाकून कामाधामामध्ये मन घालू लागले. नाही तर या माणसासारखी माणसे कोणत्या वेळी काय संकट ओढवून घेतील, ते सांगता येत नाही.

मागच्या काही दिवसांपासून का कुणास ठाऊक ते थोडेही प्रसन्न नव्हते. कोणास ठाऊक सकाळी कुठे जातात आणि दुपारी परत येतात ते. थोडंस खाऊन ते परत बाहेर जातात. एके दिवशी विचारलं, 'स्वयंपाक्याचा शोध चालूच आहे का?'

म्हणाले, 'नाही, आणखीही काही कामं आहेत.'

माघाचा महिना. परंतु थंडी थोडीसुध्दा कमी झाली नव्हती. दुपारच्या वेळीही थंडीने शरीर थरकापत असे. घराच्या छपरावून मुलायम उन्हे ओट्याच्या टोकापर्यंत पसरलेली होती. उन्हात चटाई टाकून सुपारी कातरत बसले होते, तर हे बाहेर जाण्याची तयारी करीत होते. जवळ जाऊन विचारलं, 'कुठं चाललात?'

'कोणतं काम, जरा मलाही ऐकू द्या. बघावं तेव्हा बाहेर. थोडा वेळही घरी थांबत नाहीत, अशा कोणत्या कामात गुंतलात तुम्ही?'

ते हसून म्हणाले, 'असंच काही आवश्यक काम आहे.'

जवळ जाऊन त्यांचा हात दोन्ही हातांमध्ये गच्च पकडून म्हणाले, 'माझी शपथ आहे तुम्हाला, सांगा, काय काम आहे?'

पुष्कळ वेळपर्यंत मनातल्या मनात त्यांनी काय विचार केला कोणास ठाऊक. म्हणाले, 'कुठं नोकरी मिळते का ते पाहतोय.'

विचारलं 'का?'

माझ्या गालावर एक हलकीशी चापट मारत म्हणाले, 'नाही तर घरचा खर्च कसा चालेल वेडे? मी काय श्रीमंत थोडाच आहे! मग माझ्या कमरेभोवती एक हात टाकून म्हणाले, 'जेवढा पैसा होता,

त्यावर आजपर्यंत चाललं. आता पुढे निभणं कठीण आहे. दुकानावरही खूप उधारी होऊन बसली आहे. दुकानदार आता पैसे घेतल्याशिवाय सामान द्यायला तयार नाही. पैसे मिळवण्याचं काही साधन शोधल्याशिवाय इथून पुढे निभणार तरी कसं?'

विचारलं, 'मिळाली नोकरी?'

'इतक्या सहजपणे नोकरी कशी मिळेल, सांग बरं?'

'आता काय होईल हो?'

'काय होईल. रात्रंदिवस प्रयत्न तर करतो आहे. जर मिळालीच नाही तर इथं पडून उपाशी थोडंच मरायचं आहे? सगळेच इलाज संपले तर मग मात्र गावाकडे जावंच लागेल.'

गावाकडं जायचं नाव निघताच अज्ञात भयानं माझं सारं शरीर थरथरू लागलं. आईवडील तर राहिले नाही आता, मग कोणत्या ओढीनं गावाकडे जायचं! परंतु कटकमध्ये तर देवी पसरल्या आहेत आणि हे तर सतत बाहेर फिरतीवर असतात, इथं एक दिवस राहायचं म्हणजेही जीव घाबरून जातो.

विचारलं, 'कटक सोडून आणखी कुठं नाही का जाता येणार?'

ते म्हणाले, 'कुठेही जा हीच परिस्थिती आहे. नोकरीसाठी अशाच कटकटी. गावाकडे जाण्याशिवाय आता दुसरा कोणता मार्ग नाही.'

'केवळ माझ्यासाठीच तुम्ही एवढे कष्ट सहन करताय ना?'

नकळत त्यांनी मला जवळ ओढलं आणि चुंबन घेतलं.

त्या रहस्यमय स्पर्शानं माझ्या हृदयात नानाविध तरंग निर्माण झाले. रक्तात वादळं पेटून निघाली. पुष्कळ दिवसांपासून झोपलेल्या जीवनाच्या प्रत्येक किनाऱ्याला तो स्पर्श काही तरी सांगत गेला. क्षणभरात कित्येक अकल्पनीय अनुभवांची जाणीव देऊन गेला.

शेवटी तेच झाले जे त्यांनी सांगितले होते. खूप शोधाशोध केली पण नोकरी मिळाली नाही. काटकसरीनं आम्ही आमचं पोट भरत होतो. शेवटी गावी जायचे निश्चित झाले. काही दिवसांपूर्वी गावाकडे जायचे म्हणजे माझ्या मनात आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. परंतु ज्या दिवशी आई वडीलांच्या मृत्यूची बातमी समजली त्याच दिवशी ते सुख, तो आनंद नष्ट झाला. माझ्या नवऱ्यानं मला सोडलंय, ही गोष्ट अत्तापर्यंत गावभर झाली असेल. इतक्या दिवसात गावाकडे न जाता यांच्याबरोबर इथं राहिले ही गोष्ट ऐकून गाववाले माझ्याबद्दल काय काय विचार करतील. सगळेच काही माझे आई वडील होऊ शकणार नाही आणि आता नाथभैय्याच्या घरी राहण्याशिवाय माझ्यापुढे पर्याय तरी कोणता उरलाय? माझ्या विवाहाच्यावेळी याच गाववाल्यांनी किती धूळफेक केली होती माझ्या नावानं. ते लोक आता काय थोडेच गप्प बसणार आहेत? गावाकडं जायचं म्हणताच काळ्या पिशाच्यासाखं एक अज्ञात भय मला गिळून टाकू पहातय पण आता दुसरा कोणता मार्गही नव्हता ना.

दुसऱ्या दिवशी कटकचे घर सोडून आम्ही खरोखर गावाकडे निघालो. कटकची लाल

माती मागे पडून गावाकडच्या वृक्षांनी भरलेल्या आणि वाकड्या तिकड्या रस्त्याने बैलगाडी चालू लागली. इतक्या दुःखातही गावाजवळच्या मैदानातील राखी रंगाची धूळ सगळ्या देहाला फासाविशी वाटत होतं. दवभरल्या जमिनीवर बागडण्यासाठी, जीवाला आधार द्यायसाठी तर त्याच स्वप्नपुरीत परत आले आहे. जिथे बालपणीची शेकडो स्वप्ने मी बाळगली होती. नाथभैय्याच्या घरासमोर गाडी येवून थांबली. अंबे आणि कटहलच्या झाडांच्या समूहातील मातीचा तो उंच ओटा पूर्वीप्रमाणेच जसच्या तसा होता. बाहेरच्या बाजूस नारळांच्या झाडांच्या रंगामधल्या मौलसिरीच्या झाडांच्या त्या ओट्यावर बऊलबरोबर मी किती खेळत असे. घराचा बाह्य भाग जशाच्या तसाच होता, काहीही बदल झालेला दिसत नव्हता. अगदी पूर्वीसारखंच होतं सगळं. नाथभैय्या गाडीतून खाली उतरत म्हणाले, 'ये'.

गाडीचा आवाज ऐकून काही नागवी पोरं बऱ्याच वेळापासून गाडीभोवती उभे राहून एखाद्या न पाहिलेल्या वस्तूंकडे पाहावं तसं गाडीच्या आत वाकून पाहात होते. नाथभैय्या उतरून थोडं पुढं गेल्यावर सगळं ध्यैर्य एकवटून ती मुलं पुढं आली आणि गाडीच्या समोर वर्तुळ करून उभी राहिली. ते विचार करीत होते आता गाडीतून जी रहस्यमय वस्तू निघणार होती ती किती अपूर्व असेल. गावच्या या अगदी अपरिचित अज्ञानी मुलांपुढे उतरताना आज माझे पाय थरथरत होते. या लोकांनी मला ओळखलं नाही की काय? मान खाली घालून तिथून झरझर आत निघून गेले.

दरवाजाच्या आत गुडघ्याएवढी घाण साचली होती. चहूकडे शांतता पसरलेली आहे, जणू फार दिवसांपासून या घरात कोणी राहिलेलं नाही. माझाजीव घाबरून गेला, नाथभैय्याला विचारलं 'वाटलं गावात कुठं गेल्या असतील. विचारलं, मावशी कुठं आहेत?'

ते हसले मग म्हणाले, 'आई इथं आहे कुठं'. 'कोणाकडे गेल्या आहेत का?'

म्हणाले, 'कार्तिकापासून ती पुरीमध्येच आहे.'

शंकित होऊन विचारलं, 'आणि बऊल?'

'बऊल? ती तर सासरी आहे.'

मनात विचार केला, चला घरी कोणी नाही. हे बरंच झालं. मला इथं कोणाला तोंड दाखवावं लागणार नाही. मग काय मी इथं यांच्याबरोबर एकटी राहीन.? म्हणाले, 'मावशी गावात नाहीत ही गोष्ट तुम्ही कटकमध्ये नाही सांगितलीत?

ते परत हसले. परंतु ते हास्य मेलेल्या व्यक्तीच्या हास्यासारखे होते. नुसतं पाहूनही भीती वाटेल. म्हणाले, 'जर हे सांगितलं असतं तर तू माझ्याबरोबर आली असतीस? त्याचं हसणं पाहून सर्वांगाला आग लागल्यासारखं झालं. संतापानं म्हणाले, 'आपल्याच गावात तुम्ही आणि मी एकाच घरात. लोक ऐकतील तेव्हा खूप प्रशंसा करतील ना! हो ना?

खोलवरच्या वेदनेनं त्यांच्या चेहऱ्यावरचं उरलं सुरलं हसूही मावळून गेलं. खाली पाहून हळू हळू म्हणाले, 'काय करणार, दुसरा उपायच नव्हता ना!

'मी म्हटलं, 'जर काही उपाय नव्हता तर मग थोडसं विष नाही का मिळालं रस्त्यात मला खाऊ घालण्यासाठी? संताप आणि लाजेनं मला रडू कोसळलं.

सांध्य ताऱ्यांबरोबर शेवटची होळी खेळून पश्चिम दिशांचे गुलाल भरले रस्ते फिकट करीत सूर्य बुडाला. झाडांच्या गर्दीत अंधाराची मयूरकंठी साडी विणली जात होती त्या वेळी. मी तशीच रडत होते. नेहमीसारखं आज ते माझं सात्वन करण्यासाठी आले नाहीत. खांबाला टेकून दगडासारखे बसून राहिले केवळ. मग कधी तरी म्हणाले, 'सकाळपासून तू काही खाल्लं नाहीस. जावून काही आणतो.

ते निघून गेले. त्यांचं बोलणं ऐकून कटकच्या घरातील पैशांच्या तंगीमुळे काढलेला तीन दिवसांचा उपासमार आठवला. विचार करू लागले.

ओह! किती कष्टदायक होतं ते सारं. ही लोकनिंदा तर काहीच नाही त्यापुढे. परमेश्वरानं शत्रूवरही अशी वेळ आणू नये. परंतु हे पुरुष असूनही इतकं सगळं दुःख डोळे झाकून सहन करताहेत -शेवटी कशासाठी? मला तिथंच कटकला सोडून हे तर आनंदानं इथं येऊ शकले असते! मी याची काय लागते म्हणून यांनी माझ्यासाठी सगळं दुःख, सगळा अपमान मान खाली घालून सहन करावं, आणि मी तर अशी की, यांच्यावर थोड्या वेळापूर्वीच नाराज झाले! जणू इथं येण्याचा सारा दोष यांच्यावरच होता. मनात एक अतिशय वाईट संशय येऊन तोंडाला येईल ते मी बोलून घेतलं. परंतु त्यांनी एकदाही तोंड उघडलं नव्हतं. जणू त्यांनी कुठला तरी फार मोठा गुन्हा केला होता. सार्थकतेचा आनंद लाखो करोडो कणांमध्ये वाटून त्यांच्या पायातळीच्या धूळीत मिसळून जाण्याची तीव्र इच्छा होत होती.

स्वयंपाक घराच्या दरवाजावर तुपाचा दिवा हातात धरून नाथभैय्यानं हाक मारली, 'सती!

जवळ गेले तर ते म्हणाले, 'थोडासा फराळ केला तरी माझं काम भागेल आज, सांग तू काय खाशील?

मी म्हटलं 'मी काही खावो की न खावो, पण तुमच्यासाठी आज जरूर स्वयंपाक होईल. तीन दिवसांपासून भाताचे दर्शन झाले नाही, हे तरी लक्षात आहे ना?

त्यांनी विचारलं, 'पण स्वयंपाक कोण करील?

'मी,

माझ्या बोलण्याला विरोध करीत ते म्हणाले, 'नाही नाही, मी आज भात खाणार नाही. इतक्या दुरून थकून भागून येते आहेस, तर आज चुलीच्या पुढे बसलं नाही तर नाही का चालणार? मी जातो आहे. थोडं फराळाचं विकत आणतो.

ते जाऊ लागले. मी कठोर स्वरात त्यांना हाक मारली, 'नका जाऊ सांगतेय बरं. ते परत आले. मी म्हणाले, 'दिवा द्या बरं माझ्याकडे, स्वयंपाकासाठी भांडारकोठडीत काय आहे ते तरी पाहते.

या वेळी त्यांनी परत थोडासा विरोध केला, 'परत तोच स्वयंपाक! मी गहिऱ्या दृष्टीने त्यांच्याकडे पाहात विचारलं, 'त्या संदर्भात आपल्याला काही विचारलंय का?'

माघाचा महिना म्हणजे मोहोर झडण्याचे दिवस. झाडी आणि जंगलातल्या पिकल्या पानांनी जमिनीवर कलाकुसर केलेल्या गालीचावर पहुडलेल्या थंडीची झोप चाळवण्यासाठी वसंताचा वारा चोरासारखा पुन्हा पुन्हा येवून जणू धुक्याची मच्छरदाणी उचकटत होता. परंतु जवळ जावून इतक्या लवकर थंडीच्या देवतेची झोप मोड करणं कठीण होतं. पिकली पानं गळून गेल्यावर प्रत्येक वृक्ष नव्या कोंभांनी लदबदून गेला होता. त्या दिवशी सकाळी सकाळी खोलीत बसून पान लावीत होते तर बाहेरून कोणाचा तरी आवाज आला, 'लोकनाथ भैय्या, घरी आहात का?

व्हरांड्यात बसून नाथभैय्या आपल्या शिक्षणाच्या काळातली काही जुनी पुस्तकं व्यवस्थित लावून ठेवीत होतं. त्यांनी विचारलं -'कोण अचुति?'

हा अचुति आमच्या गावाच्या पाठशाळेतील शिक्षक आहे. पाच वर्षापर्यंत सतत धावपळ करूनही जेव्हा त्याला प्रायमरीचीही सीमा ओलांडता आली नाही तेव्हा त्रस्त होऊन शेवटी शाळा सोडून काही दिवस कुठं त्रिनाथ मेळा लागला आहे, कुठे चौधरी तळ्यात कोणत्या दिवशी जाळी लावली गेली, कोणत्या दिवशी बकरा कापला गेला, दिवस रात्र अशाच बातम्या पसरवीत राहिला. त्यानंतर नाथभैय्याच्या प्रयत्नानं पुष्कळ कटकटी होऊन आणि बऱ्याच दिवसानंतर गावच्या पाठशाळेत एक नोकरी मिळाल्यानं आता हा मास्तर झाला आहे.

ठक् - ठक् खडावा वाजवत अंगणात शिरला. नाथभैय्याच्या जवळ बसत विचारलं, 'कधी आलात?'

'परवा' नाथभैय्यानं सांगितलं.

'आणि सगळं ठीक आहे ना? तुझी आई अजून पुरीहून परतली नाही वाटतं?'

'नाही.'

'तर मग आतल्या खोलीत कोण आहे?'

'सती.'

'सासरहून येऊन तुझ्याजवळ एकटी राहिली?'

दुसरीकडे तोंड फिरवून तो हसला. त्यानंतर कवाडाजवळ येऊन मला म्हणाला,

'का गं, इतक्या लवकर परत आलीस? सासरी काय मन लागलं नाही?' मला नमस्कार करताना पाहून म्हणाले, 'ठीक आहे. मावशी नाही, कोणी नाही तुला इथं बरं नसेल वाटत? पण हां, तुझे नाथभैय्या तर आहेत ना, का? माझा चेहरा पाहून तो हसला.

लज्जा आणि अपमान यामुळं माझा चेहरा लाल होत होता. मान खाली घालून पदर थोडा

आणखी पुढे ओढला.

आणखी थोड्या गप्पा टप्पा झाल्यानंतर तो उठला.

'आता जातो मी, काम आहे थोडं आणखी कधी येईन, या म्हणालात तर.'

त्याच्या शेवटच्या वाक्यांशातून एक प्रकारचे ओंगळ अर्थ असणारे हास्य ध्वनित होवून गेले. त्याचं बोलणं ऐकून नाथभैय्या विमनस्क होवून गेले होते. फक्त एवढंच म्हणाले. 'ठीक आहे. ये.' कदाचित त्यांना सगळं काही समजत होतं. असं वाटलं की, या गावची मुलं नेहमीच अशी क्षुद्र, अशी नीच आहेत. स्त्री -पुरुष संबंधामधील कुठल्या तरी एखाद्या बाबीला कुत्सित कल्पनेत घोळून घोळून पेश करण्यात त्यांना सुख मिळतं. हेच लोक एक दिवस आमच्या समाजाचं मस्तक बनतील, उच्चतम पदांवर आपल्या सामान्य संकुचित रोगजर्जर विचारशक्तीच्या बळावर सामान्य लोकांसाठी कायदे करायला लागतील.

अशाच प्रकारच्या उलाधालीमध्ये माझी सकाळ संपली. त्यांच्यापासून काही अंतरावर स्वयंपाकघराच्या दरवाजावर मी बसले होते. एक दोन वेळ काही तरी सांगण्यासाठीच जणू त्यांनी माझ्याकडे पाहिलं. त्यानंतर काय विचार करून कुणास ठाऊक खाली मान घालून, जेवण करून तिथून ते गुपचूप निघून गेले. सकाळच्या त्या घटनेपासून त्यांचं मन थाऱ्यावर नाही असं दिसतय.

त्या दिवशी आमची चौकशी करायला गावातलं आणखी कुणी आलं नाही. संध्याकाळ झाली. दुपारी जेवण करून नाथभैय्या कुठं तरी गेले होते. अजूनपर्यंत ते परतले नव्हते. विचार केला, स्वयंपाकाला तरी लागावं.

स्वयंपाकघरातील चूल पेटवून भांडारकोठडीत गेले तर लक्षात आले की, साऱ्या टोपल्या रिकाम्या झाल्या आहेत. तांदळाचा एक कणही नव्हता आज रात्रीसाठी. चुलीतला विस्तव कमी करून बाहेर आले. बाहेर मोकळ्या आकाशात स्वप्नप्रदेशातील राजकुमारीच्या काजळाच्या चांदीच्या डबीसारखा नवमीचा चंद्र छपरांवर हसत होता. मैदानात फिक्कट प्रकाश पसरवीत होता. उंच नारळाच्या झाडांच्या झालरीसारख्या तकाकीदार पानांवर तो प्रकाश आज बेहोष होवून ओसंडत होता. घराच्या मागील बाजूकडील उघड्या दरवाजातून रमी एकटक त्याकडेच पाहात होते तर मागून येवून कुणीतरी माझे डोळे बंद केले. शरीराच्या सुगंधावरून लक्षात आले, नाथभैय्या होते ते.

चकित होऊन म्हणाले, 'मी ओळखलंय्.'

'कोण?'

'तेच.'

'तेच कोण'

म्हणाले, 'मला नाही माहीत -जा.'

डोळ्यांवरचे हात काढून त्यांनी मला आपल्या छातीवर कवटाळलं, लाजून गेले होते तरी विरोध

केला नाही मी त्यांना. सकाळचं दु:ख या अनुभवाच्या आनंदामुळे संपून गेलं होतं. माझ्या मुखावर आपले मुख ठेवून म्हणाले, 'जर माझ्या जागी आणखी कोणी असतं तर?'

त्या उष्ण आणि कोमल स्पर्शाच्या आवेगाने उच्छृंखल रक्तप्रवाहांमध्ये आनंदाचा अग्नी पेटून उठला आणि मी सगळी शुध्द हरवून बसले. कानाजवळ त्यांच्या हृदयाच्या ठोक्यांची गती वाढली आणि माझं सारं जीवन झंकारून उठलं.

त्याचवेळी चंद्राच्या स्वच्छ प्रकाशात दरवाजाच्या मधोमध येवून उभा राहिला होता -अचुति!

आम्हाला पाहून चटकन परत फिरत म्हणाला, 'ध्यानी मनी नसतांना असाच आलो बरं का, लोकनाथ भैय्या! वाईट वाटून घेऊ नका.'

पापणी लवते न लवते तोच ते मला सोडून मागच्या बाजूने सरकले. मी कठपुतळीसारखी तिथंच उभी राहिले, जणू माझ्या हृदयाची गती एकदम थांबली होती.

ढगाआड चंद्राने तोंड लवपल्यामुळे नदीकाठचा विस्तीर्ण वाळवंटी किनारा दिसेनासा झाला होता.

सकाळी उठल्याबरोबर सर्वप्रथम मला हीच चिंता लागली की कालच्या लज्जास्पद घटनेनंतर मी आता नाथभैय्याला तोंड कसं दाखवू शकेन? प्रयत्न करून त्या दिवशी लवकर जागी झाले. हळू हळू आपल्या खोलीचा दरवाजा उघडून बाहेर पाहिलं तर नाथभैय्या कुठं दिसत नव्हते. खूप हळूवारपणे पावलं उचलत त्यांच्या झोपण्याच्या खोलीजवळ जाऊन उभी राहिले. श्वास बंद करून खिडकीच्या फटीतून आत वाकून पाहिलं -कोणी नव्हतं. मनातल्या मनात एक प्रकारच्या मोकळेपणाचा अनुभव घेत विचार केला, कदाचित माझ्यासारखीच त्यांनाही लाज वाटत असेल. त्या मुळेच सकाळी उठून कुठे तरी निघून गेले आहेत.

व्हरांड्यात उभी होते. बाहेरून कोणाचा तरी आवाज आला, 'नाथभैय्या नाहीत का? चकित होवून पाहिलं - सईता होता.

मला नमस्कार करून उभा राहिला. कित्येक दिवसांच्या विसरलेल्या आठवणी, आईवडीलांच्या काळातील लहानमोठ्या आवश्यक अनावश्यक लाखो करोडो घटना क्षणभरात श्रावणातल्या सजल मेघांसारख्या येऊन अंतर्मनाला भिजवून गेल्या. जीवनभरासाठी माझं ते सुख आता संपल होतं. आता ते परतणार नव्हतं. कसं कोणास ठाऊक माझ्या मनात आईवडिलांच्या स्मृती दाटून आल्या आहेत हे त्याच्या लक्षात आलं आणि तो काहीही न बोलता शांतपणे उभा होता. खूप वेळानंतर वर पाहून मी त्याला विचारलं, 'का, इतक्या दिवसानंतर आठवण झाली ना.'

त्याचे डोळेही अजून कोरडे झाले नव्हते. धोतराच्या शेवानं तोंड पुसत म्हणाला, 'फार दिवसांपासून विचार करतोय, यायचं यायचं म्हणून. कामाच्या ओझ्यामुळे येऊ शकलो नव्हतो मुली.' 'आजकाल कुठं आहेस?' 'इथंच, अचूति महांतीच्या घरी.'

'तोच अचूति पाठशाळेतील शिक्षक ना?' मी विचारलं.

'हां, तोच.'

इतका म्हातारा झालाय, तरीही काम करतोय. मी विचारलं.

'कारे, तुला त्यांच्या घरी जेवण तर चांगले मिळतं ना!

एक दीर्घ निश्वास सोडून तो म्हणाला, 'हो. मिळतं खरं. केवळ पोटासाठी तिथं पडून आहे. झालं. जेव्हापासून माझे मालक मालकीन गेले तेव्हापासून या तोंडाची सगळी चवच गेलीय पोरी.'

त्याचं बोलणं ऐकून मी व्याकूळ होऊन गेले. म्हणाले, 'तू इथं का नाही निघून येत?

'कुठं?' त्यानं न कळून विचारलं.

मी म्हटलं, 'तिथली नोकरी सोडून माझ्याजवळ येऊन राहायचं.'

'हां, येईन पोरी, येईन, तुझ्या आगमनानंतर कित्येक वेळा या गोष्टीचा विचार केला मी. उद्यापासून तिथलं काम सोडून तू सासरी जाईपर्यंत तुझ्याजवळच येऊन राहीन पोरी.' वाटलं, हाय! माझा सासरशी संबंध कायमचा संपलाय ते या बिचाऱ्याला अजून माहित नाही. कदाचित गावातही कोणाला ही गोष्ट माहीत झालेली दिसत नाही.

आणखी थोडा वेळ बसल्यावर तो जाण्यासाठी म्हणून उभा राहिला. म्हणाला, 'आज जातो पोरी - काम आहे. उद्यापासून तर इथंच राहायचं आहे. काय विचार करून कोणास ठाऊक थोड्या अंतरावरून तो परत आला. धोतराच्या शेवामधून एक पांढरा कागद काढून माझ्या हाती देत म्हणाला, 'अचुति मास्तरांनी तुला द्यायला म्हणून दिलाय -विसरलोच होतो.

आश्चर्यानं विचारलं, 'मला?'

'हो, तुलाच तर द्यायला सांगत होता.'

चिठ्ठी वाचून माझं सारं शरीर संतापानं तप्त झालं. म्हणाले, 'जा, 'त्याला सांगा की, ही गोष्ट परत त्याच्या जिभेवर येता कामा नये.'

सईता वेड्यासारखा क्षणभर माझ्या तोंडाकडे पाहात राहिला आणि मग हळूहळू तिथून निघून गेला.

स्तंभित होवून विचार करू लागले, किती अद्भूत साहस केले होते अचुतिने. पत्रांमध्ये लिहिलं होतं. हे पत्र वाचून नाराज होऊ नकोस. नीट विचार कर. त्यात तुझंच भलं आहे. वाईट नाही. तुझ्या वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या साऱ्या संपत्तीची उत्तराधिकारी आता तूचआहेस! एवढ्या सगळ्या संपत्तीचा तुला काही उपयोग नाही. हे तुला माहीत आहे. तेव्हा माझं तुला सांगणं आहे की, ती सर्व तू मला देवून टाक! काल रात्री तुझ्या घरी मी जे माइया डोळ्यानं पाहिलं, त्याचा जर मी उच्चार केला तर तुझे यजमान तुला घरात घेणार नाहीत हे मला चांगल्या प्रकारे माहीत आहे. माझ्या

पेक्षा अधिक चांगल्या प्रकारे माहीत आहे. तुम्हा दोघाबद्दल दरम्यानच्या काळात गावात अनेक ठिकाणी चर्चा चालू असतानाही मी कालची घटना कोणालाच सांगितली नाही. जर तू माझं म्हणणे मान्य करण्यासाठी तयार असशील तर मी साऱ्या गोष्टीवर पडदा टाकायला तयार आहे. आणि जर तू माझं म्हणणं ऐकायला तयार नसशील तर, मात्र कालची गोष्ट मी गावभर पसरवून देईल. याचा परिणाम काय होईल हे तुझ्या लक्षात आलेच असेल. तुला आणि तुझ्या नाथभैय्यालां या गावचे लोक जाती बहिष्कृत करतील. अन्न पाणीही बंद करू शकतील. तुझे यजमान या गावचे जमीनदार आहेत. तू येथे लोकनाथ भैय्याबरोबर एकटीही राहतेस, घरात आणखी कोणीही स्त्री नाही, ही बाब अजून त्यांना माहित झालेली नाही. जर माहीत झाली तर, ते तुझा चेहराही पाहाणार नाही. लोकनाथभैय्यालाही ते सहजा सहजा सहजी सोडणार नाही. आणि जावई असल्यामुळे तुझ्या वडीलांची सगळी संपत्ती तेच घेतील. आता स्वखुशीने जे करणार नाहीस तेच तुला एक दिवस नाईलाजाने करावं लागेल. ही संपत्ती तुझ्या हातून जाईलच जाईल. फायदा काय होईल तर तुझे यजमान तुला घराबाहेर हाकलून देतील आणि या गावात तोंड दाखवायला तु लायक राहणार नाहीस. मग ना इकडची राहशील ना तिकडची राहशील. जर तु माझं म्हणणं ऐकलं तर या सगळ्या संकटातून तुझी सुटका करीन मी.
मला आशा आहे की, सगळ्या गोष्टींचा नीट विचार करून तू माझं म्हणणं मान्य करशील. या माणसाबरोबर तुझा होकार आला की, संध्याकाळ तुझे खुषी पत्र तयार करून आणेल मी. तुला फार काही करावं लागणार नाही, फक्त एक सही तेवढी केली की पुरे. यानंतर सासरहून कधी येथे येवून राहायची तुला इच्छा झाली तर, त्यातलीच एक खोली आणि वेळ निभावून नेण्यापुरतीच दोन तीन बिगे जमीन मी तुला देईन. आशा आहे की, या गोष्टीवर शांतपणे विचार केल्यावर तू तुझ्याकडे आलेल्या माणसाजवळ काय ते कळवशीलच.

आणखी एक, हे पत्र वाचल्यानंतर फाडून टाक. लोकनाथ भैय्यांना हे कळता कामा नये. मला माहीत आहे, ते तुला मारझोड करून तुझी सर्व संपत्ती हडप करण्यासाठी आणि तुझा सर्वनाश करण्यासाठी टपलेले आहेत. त्यांच्या बोलण्यावर थोडाही विश्वास ठेवू नकोस, सावधान.

संताप, अपमान आणि लज्जा यामुळे माझी विचारशक्तीच संपुष्टात येते आहे. अचुति काय माणूस आहे? कुणास ठाऊक किती वेळ मी भिंतीच्या आधारे बसून राहिले होते, भिंतीपेक्षाही निर्जिव होऊन एकाएकी खांद्यावर कोणाच्या तरी श्वासाच्या मृदूल स्पर्शाची जाणीव झाल्याने दचकून मी पाहिलं नाथभैय्या होते ते.

माझ्या हातून पत्र ओढून घेऊन त्यांनी वाचलं. त्यानंतर संतापाने गरजत म्हणाले, 'कुठं आहे तो कुत्रा? आणि पत्राचे तुकडे तुकडे करून वेगात ते बाहेर निघून गेले. बाहेरच्या बाजूने अगदी दाराशीच जातानाची त्यांच्या सावलीची अंतिम रेघ दिसेपर्यंत मी एकटक पाहात राहिले. वाटले, हे असे जिद्दी. कोणास ठाऊक कशातून काय करतील ते. कशाला यांना पत्र वाचू दिलं बरं, स्वतःच फाडून टाकलं असतं तर बरं झालं असतं. चिठ्ठी वाचल्यानंतर इतक्या संतापात आले आहेत की, काही तरी भयानक केल्याशिवाय
तसे परत येणार नाहीत ते.

शंकाकुशंकांनी माझा सारा दिवस अस्वस्थेत गेला. दुपारही आता संपत आली होती, तरी नाथभैय्या अजून परतले नव्हते. काय झालं असेल कुणास ठाऊक? बाकी सगळ्या गोष्टींचा विसर पडून केवळ हीच एक गोष्ट पुन्हा पुन्हा मनात येत राहिली. इतका वेळ गेले तरी कुठं हे? काही वाईट तर घडलं नाही?

संध्याकाळी सईता आला. म्हणाला, 'तिथली नोकरी सोडून आलो पोरी.'

सईताला पाहून अथांग समुद्रात किनारा सापडल्यासारखा झाला होता. मी विचारलं, नाथभैया कुठे गेलेत ते पाहिलंस का?' तो म्हणाला, 'आज सकाळी अचुति मास्तरांच्या घरी पाहिलं होतं. काय कुणास ठाऊक, अतिशय संतापाने मास्तरांबरोबर बोलत होते. दुपारच्या वेळी याच शेतांधून निघून कुठे दुसऱ्या गावी गेलेले आहेत.'

निश्चिंत झाले मी - चला, सही सलामत तर आहेत अजून. मी म्हटलं 'ज्या दिशेने ते गेले त्या दिशेने तू थोडे जावून येशील का?'

'का?'

'सकाळपासून काही न खाता निघाले आहेत. जा त्यांना बरोबर घेऊनच ये'.

सईता निघून गेला. मनाला तेवढाच दिलासा मिळाला. की, या गावातले सारे लोक एकत्र येऊन जरी माझ्या विरोधी गेले तरी दोन माणसं तरी माझ्या बाजूनं आहेत, जी वेळ आलीच तर आपल्या प्राणाने मोल देऊन माझ्या अब्रुचे रक्षण करतील.

संध्याकाळच्या घंटा वाजून बराच वेळ उलटल्यानंतर नाथभैय्या त्या दिवशी परत आले. व्हरांड्यात जेवण वाढून आणलं. खातांना ते म्हणाले, 'आज खूप गंमत झाली. सकाळी गावभर अचुतिला शोधलं आणि त्याच्या घरी जावून पोचलो. बाहेर उभं राहून तो कोणाशी तरी बोलत होता. मला पाहिल्याबरोबर घरात जावून लपला. खूप बोलावलं पण बाहेर आला नाही. त्याच्या बायकोनं येवून सांगितलं, 'ते नाहीत. तिनं असं सांगितल्याबरोबर मी म्हणालो, 'काही हरकत नाही, परंतु जेव्हा येतील तेव्हा सांगा की, त्याच्याबद्दल रिपोर्ट करण्यासाठी पोलिस स्टेशनला जात आहे. इतकं ऐकल्याबरोबर एखादा उंदरासारखा तो बाहेर आला. पहिल्यांदा तर माझ्या तोंडाला येईल ते बोलला. मग नंतर मात्र सांगितलं की, इथून पुढे कधी माझ्या घराच्या दरवाजावर जरी पाऊल ठेवलस तर परत जाऊ शकणार नाहीस हे ध्यानात ठेव.

'काय म्हणाला तो?'

'म्हणतो काय? कदाचित आज जमीनदाराकडे माझ्याविरुध्द तक्रार घेऊन गेला असेल,' आश्चर्याने चकित होऊन विचारलं, खरंच? म्हणाले, 'हो, जाऊन दे. मला त्याची भीती नाही. गोष्ट काय लपून राहणार आहे? जमीनदारही विचारपूर्वक निर्णय घेतील.

विचार केला. 'हे जमीनदार म्हणजे माझे यजमानच आहेत की, त्यांची समज किती आहे ते मला पूर्णपणे माहित आहे. जमीनदार म्हणून समाजानं यांच्या हातात प्रचंड सत्ता दिली आहे. असे

किती लोक आहेत की जे सत्तेचा सद्उपयोग करतात? शासनाच्या नावावर रोज जो अत्याचार, अविचार आणि व्यभिचार हे लोक डोळे बंद करून करीत आहेत
त्याचा हिशोब कोण ठेवणार? जमीनदाराची इच्छा हाच न्याय म्हणविला जातो. त्यांच्या लालसेसाठी गरीबाचं सर्वस्व, सतीचं पवित्र्य रोज हजारोंच्या संख्येने बळी जातं आहे पण समाज मात्र डोळे झाकून हे सगळं सहजपणे सहन करतो. हेच आहे शासन आणि हाच आहे समाज. हाय रे. लोक यांच्याकडून काय म्हणून चांगल्या विचारांची अपेक्षा ठेवीत असतील.

फाल्गुनातील संध्याकाळच्या गुलाल भरल्या आकाशात जरीनं सुशोभित झालेला ढगाचा एक तुकडा त्याच रंगात रंगून गेला आहे. प्रचंड जंगलाच्या जवळ असणाऱ्या झाडांच्या रांगांमधील मुलायम पानांमध्ये सुंदर फुलं जणू खोवली जात होती. नवरदेव-वसंताच्या स्वागतासाठी. नव्या पानांच्या सुगंधाने उत्तेजित होऊन या फांदीवरून त्या फांदीवर उडणारी एक सोनेरी चिमणी म्हणजे दाट वेळूवनातील अंधाराच्या कसोटीवर उमटलेली सोनेरी रेघच होती. घराच्या मागल्या बाजूस उभी राहून केव्हापासून कुणास ठाऊक मी हा मुलायम पानांचा महोत्सव पाहात होते. वाटत होतं की धावत धावत जावं आणि या जंगलामध्ये हरवून बसावं. असंही वाटत होत की अंब्याच्या फांदीवरून खुपशी मुलायम पानं तोडून आणावीत आणि आत बाहेर सर्वत्र लावावीत. परंतु इतकी साधी आणि सोपी इच्छा पूर्ण करण्याचे स्वातंत्र्यही माझ्याजवळ नव्हते. आल्यापासून लाजेनं दाराबाहेर पाऊलही ठेवलं नाही. कोणी विचारू नये, पाहू नये म्हणून. मला पाहून गावभर जी दंगल उसळली आहे ती मला घरी बसूनही चांगल्या तऱ्हेने अनुभवाला येते आहे. जणू गावातले सगळे लोक माझ्याविरुध्द एकत्र झाले आहेत. त्यांना माझ्याशिवाय दुसरा विषयच सुचत नाही. बाहेर कोणाचा आवाज ऐकला की, घरात मी लाजेनं चूर होऊन जाते. जणू काही सर्वांसमोर मी फार मोठी पापीण आहे. नाथभैय्या मात्र एखाद्या वादळासारखं सारा संकोच, साऱ्या अडचणी कठोरपणे आपल्या रस्त्यातून बाजूला करून स्वतंत्रपणे विहार करीत आहेत. यांच्याबद्दल विचार करतांना फार आश्चर्य वाटतं.

काही वेळानंतर सईता आला. मला दरवाजाजवळ पाहून काही न बोलता खाली मान घालून व्हरांड्यात जावून बसला. विचारलं, कुठं गेला होतास आतापर्यंत?

तो चिडून म्हणाला, 'मरायला.' जवळ जाऊन आश्चर्यानं विचारलं, 'सांग ना, कुठं होतास?' 'सांगितलं ना मरायला! संध्याकाळी मला अजून कुठं मरायला जागा मिळाली नाही, म्हणून गावातल्या भगवान महाराजाला नमस्कार करायला गेलो होतो.'

'आग्रहानं विचारलं 'का काय झालं?'

'व्हायचं काय? खाऊन पिऊन पोट भरलं की या तोंड जळाल्या बामनांना काम तर काही असत नाही. मग काय भक्त मंडळीत बसून याची त्याची निंदा कर हेच यांचे चालू असते. तो अचुति मास्तर आहे ना, तो इतका चोर आहे हे मला कुठं माहीत होतं? हात हालवू हालवू तिथं सांगत होता.' एवढं बोलून तो गप्प बसला.

अचुतिचं नाव माझ्या छातीत धड झालं.

संशयानं विचारलं, 'काय म्हणत होता?'

'आता तुला ते काय सांगू पोरी!' त्यानं सांगितलं, 'संध्याकाळच्या वेळी इतक्या खोट्या गोष्टी सांगतांना त्याची जीभ कशी झडून पडली नाही याचंच मला आश्चर्य वाटतं. सांगत होता, अनादि मिश्रांची मुलगी सतीला तिच्या नवऱ्यानं घराबाहेर हाकलून दिला. आणि सर्वांच्या समोर तो असंही सांगत होता की, ते आता तिचं तोंडही बघणार नाहीत. तिने जात - कूळ सोडलंय आणि तिच्या हातचं पाणीही कोणी स्पर्शू नये. कोणत्या आनंदात
लोकनाथ तिवारींनी तिला आपल्या घरात घेतलंय? जर लोकनाथ तिवारींनी तिला आपल्या घरातून बाहेर काढलं नाही तर त्यांच्या बरोबरीचे मैत्रीचे संबंध आम्ही तोडू. एवढंच नव्हे तर त्याला वाळीत टाकू. दगडासारखं उभं राहून त्यानं म्हटलेलं सगळं काही ऐकून घेतलं पोरी. असल्या संपूर्ण खोट्या गोष्टी कुठपर्यंत ऐकणार, शेवटी मीही रक्तमांसाचा माणूसच तर आहे! जेव्हा सहनच झाले नाही तेव्हा म्हटलं जरा खालच्या बाजूला प्रकाश तरी दाखवा बरं, याचा चेहरा तर पाहू असं म्हणत ही काठी उचलून त्याच्या अंगावर धाऊन गेलो. तिथं जे लोक होते त्या पैकी काही हां हां म्हणता पळत आले आणि मला पकडून ओढत इथं आणून सोडलं. नाही तर आज तो राहिला असता किंवा मी.' सांगता सांगता संतापानं सारं शरीर थरथर कापू लागलं.

लज्जा आणि अपमान यामुळे काही बोलण्याची शक्तीच उरली नव्हती माझ्यात. गुपचूप खोलीत जाऊन पडून राहिले. तिथंच उशीत तोंड लपवून मनातल्या मनात म्हणाले, 'हेच ऐकण्यासाठी मला जिवंत ठेवलं का परमेश्वरा!

तुझ्या या विशाल सृष्टीमध्ये कणभरही विष नव्हतं का या बेसहारा आयुष्याला संपविण्यासाठी! म्हणजे फार लवकर खेळ संपला असता. या दुर्दैवी जीवाबरोबर एक पवित्र निष्पाप जीवन अशाप्रकारे बांधल्या जाऊन विनाकारण तकं लांछित आणि अपमानित तरी झाले नसते. माझ्यावर आलेल्या कलंकाचा कोणाला भागीदार बनविण्याचा मला अधिकार तरी काय होता? माझ्यावरचा हाकलंक आणि माझी निंदा ऐकू शकणार नाहीत म्हणून तर माझ्या आईवडिलांनीजगाचा लवकर निरोप घेतला नाही? अग्नीच्या साक्षीनं आणि ब्राम्हणांच्या समोर ज्याच्याशी माझी नवरा म्हणून गाठ मारली गेली त्याच्याशी सारे विरोध बाजूला ठेऊन कुठे तसे संबंध प्रस्थापित करता आले? आता माझी चिंता करणारं या जगात आहे तरी कोण? आपली प्रतिष्ठा, आपला अभिमान कणाकणाने माझ्यासाठी विसर्जित करणारे हे नाथ भैया माझे कोण आहेत? आणखी विचार करू शकले नाही. कोण आहेत हे नाथ भैया? ते कोण आहेत माझे? सगळं काही.... सर्वस्वच! जगातल्या लोकांनी हजार वेळा जरी नाकारलं, लाख वेळा जरी अस्वीकृत केलं तरी ज्यांना मी 'माझं' मानलं असे ते हे एकच गृहस्थ आहेत. जेव्हा पासून मला कळू लागलं, तेव्हापासून स्त्रिचं सारं देणं मनातल्या मनात त्यांनाच तर अर्पण करीत आले.

बाहेर आवाज ऐकू आला, पाहिलं तर नाथ भैया परत आलेले होते. व्हरांड्यात सईताला पाहून त्यांनी माझ्याबद्दल चौकशी केली, सईतानेही काय उत्तर दिले ते इतक्या दुरून मला ऐकू आले नाही. त्यानंतर हातपाय धुवून स्वतःच जेवण वाढून घेऊन खायला बसले. खोलीत पडल्या पडल्या

सगळं काही मी पाहात होते. आज या घटनेनंतर त्यांच्यापुढे जाण्यासाठी माझ्या पायात बळच नव्हतं. जेवण झाल्यानंतर हात धुवून ते झोपायला गेले. विचार करता करता त्या दिवशी रात्री बराच वेळपर्यंत मला झोप आली नाही. ज्याच्या मनात अप्रतिहत पेटता अग्नी आहे, त्याला झोप कशी येणार?

घरामागील बाजूच्या दाट झाडीतील गहन शांततेचं हृदय चिरत कोल्हा दोन वेळा ओरडून गेला. अंथरूणात पडल्या पडल्या उकाडा जाणवू लागला म्हणून दरवाजा उघडून बाहेर आले. नाथभैयाच्या खोलीचा दरवाजाही उघडाच होता. तेही अंगणातच फिरत होते. कदाचित् माझ्या सारखीच त्यांनाही चिंतेनं ग्रासल्यामुळे झोप येत नसावी. व्हरांड्यात मला पाहून म्हणाले, 'कोण सती का?'

ते माझ्याजवळ आले. पहिल्या सारखंच माझ्या पाठीवर हात ठेवून स्नेहभरल्या आवाजात म्हणाले,

'झोप येत नाही का?'

वाटलं, या प्रेमाच्या भुकेल्या प्राणावर न मागताही हेच अथांग, असीम प्रेम तुम्ही उधळून मला बरबाद केलंय. या असीम प्रेमाचा मधुर मोह सोडू शकले नाही म्हणून तर नवरा आणि सासर मला विषममान वाटले. याच एका मोहामुळे गावातले इतके अपमान, इतका कलंक सहन करून गुपचूप पडून आहे. परंतु आता नाही. माझ्या डोळ्यासमोर तुमचा होत असलेला अपमान नाही पाहू शकत मी. नाही पाहू शकत.... हे शेवटचंच आहे!

दुसरीकडे तोंड फिरवून तशीच दगडासारखी उभी राहिले. मनात असूनही त्यांच्या बोलण्याला उत्तर देऊ शकले नाही मी. उत्तर न मिळाल्यामुळे ते माझ्या आणखी जवळ आले. माझं मस्तक आपल्या छातीला लाऊन म्हणाले, 'इतक्या रात्रीपर्यंत जागायचं असतं का? चल, पंखा ढाळतो मी, चटकन् झोप लागेल.'

त्यांच्यापासून दूर होत निग्रहाने म्हणाले, 'मी नाही झोपणार, जा' आकाशाच्या कोपऱ्यात बुडत असलेल्या चंद्राच्या शेवटच्या चांदणीचा प्रकाश वेळूच्या घनदाट झाडीवर टकरून दरवाजापुढे मंदसर असा पसरलेला होता. त्याच मंद प्रकाशात पाहिलं, तीव्र वेदनेमुळे त्यांचा चेहरा पाहता पाहता अस्तास जाणाऱ्या चंद्रासारखा फिकट पडला होता. त्यांच्याशी जे दारूण व्यवहार घडत होते त्यामुळे अश्रूंनी माझा गळा दाटून आला होता. उगीच बळ एकवटून आणि आवाज वाढवून म्हणाले, 'तुम्ही मला इतकं त्रस्त का करीत आहात? माझ्यासाठी मरायला थोडीसुध्दा फुरसत नाही का तुमच्याजवळ?'

दगडी शिल्पासारखं शांत उभे होते ते. खाली मान घालून. नंतर तिथून मी हळूहळू जाऊ लागले, परंतु स्वतःला नाही सांभाळू शकले मी. मानवी रूपातच तर जन्मलेय ना मी, मग किती सहन करणार? पळायला गेले आणि त्यांच्या छातीवर मस्तक लपवून ढसढसून रडू लागले. मुलासारखं त्यांनी मला उचलून घेतलं आणि अंथरूणावर झोपवलं. आपल्या धोतराच्या पदरानं माझे अश्रू पुसले आणि आपले मुख माझ्या मुखाजवळ आणून म्हणाले, 'का रडते आहेस? छी, चांगली गोष्ट नाही

ही. एवढ्याशा गोष्टीमुळे असं सगळं धैर्य गमावून बसलं तर कसं चालेल? तू रडू नकोस, फक्त काळीज घट्ट करून पाहात राहा पुढे काय काय होतं ते!' त्यांचं शरीर माझ्या शरीराला अगदी घट्ट चिकटून होतं, श्वासाचा एक जादुमय सुगंध माझ्या मस्तकात शिरला आणि सगळे दु:ख विरून जंजाळ मी विसरून गेले. मी जगाला विसरून गेले, समाजाला विसरून गेले. अर्धवट प्रकाश, अर्धवट छायांनी वेढलेल्या समुद्रातून पाळण्यात बसून कुठल्या स्वप्ननगरीत गेले मी -असं वाटत होतं. त्याच अवस्थेत शांत पडून राहून सगळी इंद्रिये त्यांच्या स्वाधीन केली आणि त्यांचा छातीची प्रेमळ उब अनुभवू लागले.

थोडा वेळ गेला.

ते उठले. म्हणाले, 'थोडी झोप घे. रात्र संपायला अधिक वेळ नाही, आता.'

अतिशय हळुवारपणे दरवाजा ओढून ते निघून गेले.

o o o

सकाळी अजून सगळीकडे चांगलं उन पडलं नव्हतं. मी रात्रीची खरकटी भांडी घेऊन घासायला बसले होते की, बाहेरून कुणाचा तरी आवाज आला -'लोकनाथ! लोकनाथ!'

नाथभैया खोलीत बसून मासळी पकडण्याचा जुना बांबू कामचलाऊ असा बनवित होते. आवाज ऐकून बाहेर आले. थोड्याच वेळात अनेक लोकांचे आवाज येऊ लागले. भीतीने माझ्या छातीत धस्स झाले. हळूच जाऊन बाहेरच्या दरवाजाच्या फटीतून पाहिलं. बाहेर खूपशी माणसं जमली होती. आमच्या गावच्या पुरोहिताचा मुलगा प्रभाकर मिश्र खूप उत्तेजित होऊन बोलत होता, जर तू असं करणार नाहीस लोकनाथ, तर या सर्व लोकांच्या समक्ष तुला सांगून टाकतो की, तुझा हुक्कापाणी, धोबी न्हावी नाईलाजाने बंद करावं लागेल. ह्याशिवाय तुझ्या श्राध्द, मौजीबंधन -लग्न इत्यादीसाठी ह्या गावातील लोकांची गोष्ट तर सोडच पण आसपासच्या दहा कोसातील कोणी ब्राम्हण तुझ्या दरवाजावर पाऊल ठेवायला येणार नाही.

नाथभैयाने उपहासाने संतापानं विचारलं, 'फक्त एवढंच की आणखी काही?'

प्रभाकर मिश्र म्हणाला, 'लोकनाथ! गोष्ट तू नीट समजवून घेतल्याशिवाय असं उत्तेजित होऊ नकोस. अशाच प्रकारे कालही तू एवढ्या मोठ्या ब्राम्हण समाजातून संतापाने उठून आलास. त्यासाठीही आम्ही तुझ्यावर काही आरोप ठेवीत नाहीत, आलं लक्षात?'

त्यानंतर थोडंसं थांबून खाकरून म्हणाला, 'अनादि मिश्रांची मुलगी तुझी कोण आहे? तू तिच्यासाठी आमच्याशी काय म्हणून शत्रुत्व विकत घेतो आहेस? भावाभावामध्ये विनाकारण अशांतता तू का निर्माण करतो आहेस? ठीक आहे, जे झालं ते झालं, आता तू तिला घराच्या बाहेर हाकलून दे. ब्राम्हण समाजाची माफी मागून थोडेसे प्रायश्चित घे, म्हणजे तुझ्या सगळ्या अडचणी दूर होतील. ज्याअर्थी तिच्या नवऱ्यानं तिला सोडून दिलं आहे, त्याअर्थी तिला कुलत्यागी च समजलं जाईल. कुलत्यागिनीचा अर्थ आहे......'

नाथभैया संतापाने केवळ गरजले, 'पुढे काही सांगायची आवश्यकता नाही. जर स्वत:चे

बेरवाईट करून घ्यायचे नसेल तर आताच्या आता इथून निघून जा. नाहीतर पोलिसांना बोलविन.'

तो अचुतिही मिश्रजींच्या मागे उभे राहून त्याच्या खांद्यावरून इकडचं पाहात होता. नाथभैयांचा संताप पाहून एकदम घाबरून त्याने मानच खाली घातली. प्रभाकर मिश्र चकित झाले. परंतु संतापाने आपली दुर्बलता झाकण्याचा प्रयत्न करीत म्हणाले, 'परंतु तुम्ही विनाकारण का.....'

नाथभैया मध्येच त्याला अडवित म्हटले,

'जाता का बोलवू फौजदारांना?'

त्यावेळी अच्युतिही बाहेर येऊन म्हणाला, 'चला मिश्रजी आपल्या रखेलीला घेऊन सुखानं राहू द्या त्यांना, आपल्याला काय करायचे आत पडून!'

प्रभाकर मिश्र काही म्हणण्यापूर्वीच अच्युतिने त्यांना ओढत नेलं. जाता जाता मिश्रजींनी जानव्याला स्पर्श करून शपथ घेतली, 'जर ब्राम्हणाचा मुलगा असेल तर मी करूनच दाखवीन.'
हे ऐकून माझी सगळी बुध्दी ज्ञान हरवून गेल्यासारखी झाली. मला याचेच आश्चर्य वाटले की, माझे दोन्हीही पाय सरळ होते तरी कसे! नाथभैयाने व्हरांड्यात पाऊल ठेवल्याबरोबर मी त्यांच्याकडे धावले आणि त्यांच्या दोन्हीही पायामध्ये डोकं आपटून हमसून हमसून रडू लागले. म्हणाले, 'नाही नाही, आपण माझ्यासाठी संकटे का म्हणून ओढवून घेता आहात? मला घराबाहेर हाकलून द्या, सगळ्या कटकटीच मिटून जातील. जा बोलवा त्यांना....'

दोन्ही हातांनी धरून मला उठवून त्यांनी माझ्या डोळ्यातील अश्रू पुसले. हसत हसत म्हणाले, 'बरं ठीक आहे काढून टाकीन.'

o o o

वसंत सरत चालला होता. फाल्गुनात उमललेल्या फुलांच्या पाकळ्यातील सौंदर्य आता चैत्रामधल्या धुळीनं आणि रेतीनं भरलेल्या वाऱ्यामुळे नष्ट होत होते. पागल घोड्याप्रमाणे वाहणारा हा वारा मैदान ओलांडून पलीकडे असलेल्यातांडवनाच्या मचानावर सवार होऊन बेभान वाहू लागला आहे. वाटलंआयुष्यभर माझ्यामध्येही अशाच प्रकारचं वादळ वाहते आहे. लग्नानंतर तापर्यंत दोन वर्ष गेली. थोडीही शांतता मिळाली नाही या जीवनाला? जगात ज्या गोष्टी मिळाल्यानंतर आमची जात स्वतःला भाग्यवती समजते ते सगळं तर मला मिळालं होतं. आईवडील प्रेमसौभाग्य आणि जमीनदार नवरा. मग काय बरं कमी होतं माझ्या नशिबात? परंतु हे सगळं मिळूनही न मिळाल्यासारखं झालं! सगळ्यांचेच नवरे काय त्यांच्या मनाप्रमाणे मिळतात? जीवनभर काय ते आपल्या बायकोला थोडेच डोक्यावर घेऊन बसतात. पतीच्या आवडी, पतीच्या सवयी यांच्याशी जबरदस्तीनं एकरूप होणं हाच तर आमच्या समाजाचा धर्म आहे. स्त्री जीवनाची सार्थकताही यातच आहे. असं सांगितलं जातं. मग नवरा कितीका चरित्रहिन असेना. पत्नीनं त्याला परम निर्विकार परमेश्वर समजून पूजा केली पाहिजे. हा कडक दंडक आमच्या शास्त्रनिर्मात्या ऋषींनी घातलाय. परंतु मी तो कुठं पाळू शकले! समाजाकडे पाहून आपल्या नवऱ्याच्या इच्छेखातर

स्वत: बळी देण्याची वेळ येण्याच्या पूर्वीच पती प्रेमाची गुलाबी स्वप्ने नेहमीसाठीच संपून गेली आणि माझ्या जीवनाची गतीच बदलली. त्यावेळी मी विचार केला होता, 'चला बरच झालं, स्त्री होण्याचं खोटं नाटक तरी संपून गेले. परंतु ज्या मोहक आशांच्या मागे लागून नेहमीचा आश्रय समुद्रात लोटून दिला आणि मनाला जे हवं त्या रंगात बुडूनही या जीवनाच्या व्यर्थतेमुळे ते रंग माझे होऊ शकले नाहीत.

जीवनभर ज्याला पती समजले, मनाच्या साऱ्या इच्छा आकांक्षा ज्यांच्या पायावर उधळून निश्चिंत होण्याची इच्छा बाळगली होती, ते माझ्याजवळ असूनही नसल्यासारखेच झाले आहे! का कुणास ठाऊक परमेश्वराने या आयुष्याला शापामध्ये गुंतवून असहाय्य करून टाकले आहे! माझ्याबरोबर इतकंच करणं पुरेसं नव्हतं का? ह्या दुर्दैवी जीवनाबरोबर ताज्या हरसिंगारच्या फुलाप्रमाणे असलेल्या एका निष्पाप, निष्कलंक जीवनाला फरफटत नेवून त्याची कोणती इच्छा पूर्ण झाली बरं? मी तर कधी असं मागितलं नव्हतं परमेश्वरा! या प्रकारच्या निंदा आणि अपमानाच्या चिखलात त्यांनी माझ्यासाठी बुडून जावं अशी तर कधी इच्छा केली नव्हती मी!

त्या दिवशी रिकामं रोपटं हातात घेऊन परत येऊन सईता म्हणाला, 'गाववाले साले सगळे एक झाले आहेत. दुप्पट पैसे देवूनही कुणी भाजीपाल्याला हातही लावू दिला नाही.

नाथभैयानं विचारलं, 'आज तर बाजार आहे ना! साऱ्या वस्तू तिथूनच का आणू नयेत.'

सईता हसला. म्हणाला, 'आज कुठं - बाजार तर परवा आहे. हे दोन दिवस कशाप्रकारे काढणार? घरात भाजी तर काहीच नाही.' काही वेळ विचार केल्यानंतर नाथभैया म्हणाले, 'ही वेळ कशी तरी निभावून घ्या. पुढचे पुढे पाहू.'

हाताच्या इशाऱ्यानं सईताला जवळ बोलावलं. मग हळू आवाजात त्याला म्हणाले, 'म्हातारा झालास पण समज आली नाही तुला अजून!'

भाजी मिळाली नाही तर त्यांना जावून कशाला सांगितलं, हे जरा मला तरी ऐकू दे बरं?'

सईता घाबरून म्हणाला, 'घ्या मला काय माहीत बरं?' मग भाजीची व्यवस्था काय करायची, हे हळूच सईताला समजावून स्वयंपाकघरात गेले. थोड्या वेळानं बाहेर येऊन पाहिलं नाथभैया तिथेच व्हरांड्यात खांबाला टेकून बसले होते. मागच्या बाजूने जाऊन उभी राहिले आणि विचारले, 'इतका वेळ झाला स्नान करायला जायचे नाही का?'

स्वप्नातून जागं व्हावं तसं माझ्याकडे पाहात म्हणाले, 'हो, जरा तेल आणून दे.'

खोलीतून तेल आणि रूमाल आणून त्याच्याजवळ ठेवलं. तेल लावून ते म्हणाले, 'सती जरा त्या खोलीतून माझा मासळी पकडायचा बांबू तर आण!'

'आता बांबू घेऊन काय करणार आहात?' मी विचारले.

'सईता सांगत होता ना की काही भाजी मिळाली नाही म्हणून! कुठूनतरी एखादुसरी मासळी

संशयानं विचारलं, 'काय म्हणत होता?'

'आता तुला ते काय सांगू पोरी!' त्यानं सांगितलं, 'संध्याकाळच्या वेळी इतक्या खोट्या गोष्टी सांगतांना त्याची जीभ कशी झडून पडली नाही याचंच मला आश्चर्य वाटतं. सांगत होता, अनादि मिश्रांची मुलगी सतीला तिच्या नवऱ्यानं घराबाहेर हाकलून दिला. आणि सर्वांच्या समोर तो असंही सांगत होता की, ते आता तिचं तोंडही बघणार नाहीत. तिने जात - कूळ सोडलंय आणि तिच्या हातचं पाणीही कोणी स्पर्शू नये. कोणत्या आनंदात 'ठीक आहे. जा, परंतु लवकर परत ये.' मी वाट पाहतो आहे. काही बऱ्यावाईटाचा विचार केल्याशिवाय सईताबरोबर बाहेर पडली. बाहेर येऊन सईतानं विचारलं, 'कुणीकडे जायचे पोरी?'

म्हणाले, 'प्रभाकर मिश्रच्या घरी'.

माझे शब्द ऐकून त्याला आश्चर्य वाटलं. म्हणाला, 'प्रभाकर मिश्रच्या घरी? तोच का ज्याने सगळं गाव एकत्र करून आपलं घर वाळीत टाकलंय, ही गोष्ट तुला माहीत नाही का पोरी?

म्हणाले, 'हो, माहीत आहे. चल.'

मनातल्या मनात संतापाने बडबडत तो पुढे पुढे चालू लागला. समारच्या एका हाताच्या अंतरावरचे एकाचे तोंड दुसऱ्याला दिवस नव्हते अशा अंधारातून मी रस्त्याच्या कडेकडेने चालू लागले. हेतू हा की, कोणी पाहू नये. प्रभाकरच्या बालपणी हे घर माझ्या किती परिचयाचे होते! कित्येक वेळा वडील मला संध्याकाळच्या वेळी इथं सोडून जात असत. मिश्रजींच्या बायकोचे वयही काही माझ्यापेक्षा अधिक नसेल. लहानपणी तिच्याबरोबर *अशोकबसले होते. त्याच आधारावर आज मनात साहस एकवटून इतकी दूर आहे, कदाचित काही मार्ग निघेल म्हणून.

व्हरांड्यात अशोका उभी होती. मला पाहून विचारलं,

'कोण आहे?'

'मी सती.'

जवळ येऊन तिनं अपरिचितासारखं मला पाहिलं, त्यानंतर जोरात ओरडली, 'दूर हो, दूर हो, देवघर आहे हे. विटाळ होईल.'

या एकाच गोष्टीमुळे मनात जी थोडीशी आशा होती तिचाही चकनाचूर झाला. खरोखरच मी इतकी हीन, अपवित्र झाले काय की माझ्या सावलीनेही सर्वत्र विटाळ व्हावा? परंतु जन्मावरून जर पाहिलं तर परमेश्वराच्या दृष्टीने ही माझ्यापेक्षा कोणत्या बाबतीत श्रेष्ठ आहे ? केवळ आंधळ्या

---

* अशोका : अशोकाष्टमीच्या दिवशी अशोक फुलाची कळी एक दुसरीला खाऊ घालून दोन मुली आपले दुःख कमी करण्यासाठी जे नातं प्रस्थापित करतात त्याला 'अशोका' म्हणतात. या घटनेनंतर या मुली एक दुसरीला 'अशोका' म्हणूनच हाक देतात. नाव घेऊन बोलणे हे पाप समजले जाते.

समाजाच्या विचारहीन आदेशांप्रमाणे पुरुषांच्या इच्छेसमोर मी आपल्या स्त्रीत्वाचे सत्व विसर्जित करू शकले नाही, त्यामुळे का मी आज इतकी लहान झाले? सृष्टीतल्या सगळ्या गोष्टी मला पारख्या झाल्या? फार कष्टाने अंतःकरणाला सांभाळत म्हणाले, 'एक गोष्ट विचारायची होती तुला!' कोणती गोष्ट? तिनं विचारलं.

म्हणाले, 'जरा तुझ्या ह्यांना इकडे बोलव.'

कदाचित नकार द्यायची इच्छा असेल, पण काहीतरी विचार करून खोलीत गेली. थोड्या वेळानंतर अंगणात प्रभाकर मिश्रचा आवाज ऐकू आला. त्याची पत्नी माझ्याजवळ येऊन हळूच म्हणाली, 'आले आहेत'.
क्षणभर सगळ्या गोष्टींचा नीट विचार करून म्हणाले, त्यांना विचारां, नाथभैयाला त्यांनी समाजापासून का वेगळं केलंय? केवळ माझ्यासाठीच ना.'

प्रभाकर मिश्र भिंतीचा आधार घेऊन उभे होते. अगदी हळू आवाजात सांगूनही माझे शब्द त्यांना स्वच्छ ऐकू येत नव्हते.

काही वेळ गेला. कुणी काही बोललं नाही. त्या शांततेतच मला हवं ते उत्तर मिळालं. परत विचारलं, 'जर मी त्यांचं घर सोडून निघून गेले तर त्यांना पहिल्यासारखं जातीत मिसळून घेतलं जाईल की नाही?'

प्रभाकर मिश्रने सांगितलं, 'नक्कीच मिसळून घेतलं जाईल. आमचा काय बरं त्यांच्याशी विरोध आहे? परंतु..... परंतु....'

'त्या दिवशी इतक्या लोकांच्या समोर तोंडाला येईल ते बोलला मला.'

म्हणाले, 'त्याच्यासाठीच तर माफी मागायला आले आहे मी.' प्रभाकर मिश्र म्हणाले, 'ही पिडा जर निघून गेली तर त्या गोष्टीचाही निकाल लागल्याशिवाय का राहणार आहे? ही पिडा म्हणजे मी आहे. वर्षभरापूर्वी जिथं माझ्यावर इतकं प्रेम केलं जात होतं तिथंच आज मी याप्रकारे काटा होऊन सगळ्यांच्या मनात टोचते आहे, कशाहीप्रकारे मला इथून घालवून देण्यातच या लोकांना आनंद मिळणार आहे.

बाहेर आले मी. जाण्यासाठी सईता उठून उभा राहिला. माझ्या पुढे पुढे रस्त्यापर्यंत आला. हे लोक स्नेह - प्रेम या गोष्टींना समाजाच्या तराजूतच मोजतात. हृदयाला काही मूल्यच नाही. येताना, ' अशोकाला जाते असंही म्हणाले नाही. वाटलं म्हणाले नाही तेच बरं झालं.

o o o

मी येईपर्यंत नाथभैया खरोखरच ओट्यावर बसून माझी वाट पाहत होते. लाज वाटून त्यांच्याजवळ गेले नाही. कदाचित कुठे गेली होतीस म्हणून विचारतीलही.

खाणं पिणं झाल्यावर नाथभैया झोपायला निघून गेले. अंगण एकदम सुनसान झालं. खोलीत मी

निर्जीव होऊन पडले होते. त्या दिवशी मला झोप येण्याची काही आशा नव्हती. एकटीच असल्यानं दिवसभराच्या साऱ्या चिंतांनी माझ्याही नकळत मला घेरून टाकलं. विशेषतः नाथभैयांची चिंता. खरं आहे, कोणत्या अधिकारात आज मी यांच्या घरात राहून प्रत्येक बाबतीत यांना त्रस्त करून संपवून टाकते आहे. त्यांचा गौरव, त्यांची प्रतिष्ठा कोणत्या अधिकारात याप्रकारे जाणूनबुजून मी नष्ट करीत आहे. आमराईच्या शांततेत कोल्ह्यांनी दोन वेळा कोल्हेकुई केली. हळूहळू अंथरूणावरुन उठले. कोनाड्यात नाथभैयाच्या शिक्षणाच्या काळातली एक तेलकट वही पडून होती. कोणास ठाऊक त्यातली दोन पानं फाडून लिहू लागले....

व्यर्थ जीवनातील शेवटच्या आश्रयाजवळ उभी राहून तुम्हाला हे पत्र लिहीत आहे. ज्यावेळी तुम्ही हे पत्र वाचाल त्यावेळी मी तुमच्याजवळ असणार नाही याची मला जाणीव आहे! तरीही माझ्या हातांनी लिहिलेले हे पत्र माझ्या निरोपाच्या मुक क्षणाचा साक्षी आहे आणि तम्ही सावकाशपणाने एक एक अक्षर वाचाल ना? कोणास ठाऊक त्यावेळपर्यंत मी किती दूरपर्यंत निघून गेलेली असेल! जीवनातील परमावधीच्या अपयशामध्ये तोच माझा परमोच्च आनंद आहे. आयुष्यभर तुम्हाला विनाकारणच किती त्रस्त केलं, केवळ आपल्या सुखमय स्वप्नांच्या मागे भटकत राहून! माझ्यासाठी किती अपमानित, किती हीन झालात तुम्ही! आज त्या पापाचं प्रायश्चित्त घेण्यासाठी मी तुम्हाला सोडून जात आहे...... पण कुठं?..... ठरविलं नाही अजून. ठरवणं जरूरीचंही नाही. केवळ एवढं माहीत आहे की, मला गेलंच पाहिजे.

चहुकडे शांतता पसरली आहे. गहिऱ्या अंधारात दिशाच हरवू लागल्या आहेत. केवळ माझ्यासमोर ठेवलेला हा छोटासा दिवा कान देवून माझ्या सगळ्या गोष्टी ऐकतो आहे. दूरवर आकाशात टिटवीचा दीर्घ उदासिनतेनं भरलेला आवाज रात्रीच्या शांततेवर कारुण्याची एक रेघ ओढून गेला. रात्र अतिशय निःशब्द उदासीन वाटते आहे. माझ्या अशा कित्येक निःशब्द रात्री, कित्येक उदास दुपारी तुमच्याच आठवणीमध्ये व्यतीत झाल्या आहेत. माझ्या जीवनाचं हे मधुर रहस्यच! या व्यर्थ जीवनाच्या रंगहिन शुन्यतेमध्ये केवळ सकाळ संध्याकाळी तुमच्या स्नेह स्मृतिच्या, आशेची सोनेरी वस्त्र विणणे एवढेच माझे सुरण आहे... मी इथं बसुन लिहीते आहे, आत स्वयंपाकघरात मांजर आली आणि माझ्या चेहऱ्याकडे पाहात थोडा वेळ उभी राहिली. काय वाटून कुणास ठावूक खोलीच्या व्हरांड्याच्या कोपऱ्यात जावून कोपऱ्यात झोपी गेली. उद्या सकाळ झाल्यावर ती तुम्हाला पाहील. उद्या संध्याकाळी ही... अशा प्रकारे जोपर्यंत ती जीवंत आहे तोपर्यंत ती तुला पाहात राहील.... मी जाते आहे. कारण जाण्याशिवाय दुसरा मार्ग तर माझ्यासमोर नाही. जाताना माझी कोणाबद्दल कसलीच तक्रार नाही. कोणावर राग नाही की दोषारोपण नाही.... तुम्ही त्या खोलीत निश्चिंत झोपलात. गाढ झोपेच्या श्वासांचा आवाज कानावर अस्पष्टसा येतो आहे. तुमच्या दरवाजाची दारं धाडकन वाजली.... वाऱ्याच्या झुळकेमुळे असेल कदाचित. खोलीत घुसून खूप हळूवारपणे तुमच्या छातीवर हात फिरवून गेली असेल ती. इथं बसल्या बसल्या मलाही हवेप्रमाणेच हळूवार तुमच्या खोलीत येण्याची इच्छा होऊ लागली आहे. जवळ उभी राहून आयुष्यभर तुमच्या कपाळाचा घाम पुसला असता... आयुष्यात मी तुमची इच्छा धरली, पण अधिकार नाही मागितला. नेहमी इतकं जवळ असूनही कधीतरी मिळवेन ही आशा आजपर्यंत

मनात बाळगली होती. आता तर माझे हे शेवटचे धन ही आशाही संपली.... तुमच्या खोलीत अंधार आहे. जाताना शेवटच्या वेळी तुमचं मुखही पाहू शकत नाही मी. आणखी काही तासांनी सकाळ होईल. तुम्हाला सगळे काही स्वच्छ दिसेल. पण मला नाही. आयुष्यभर याचप्रकारच्या अंधारात तुमचा हासरा चेहरा आठवत राहून मला धैर्य जमवावं लागेल. जाताना तुम्हाला सांगून जाण्याची खूप इच्छा होत होती, परंतु हे कळल्यावर थोडंच तुम्ही मला जाऊ देणार आहात. आपल्या असीम मोहापायी तुम्ही मला हे कल्पित प्रायश्चितही नाही का मिळू देणार?

मला अधिक शोधू नका. या दुर्दैवासाठी उगीच इकडे तिकडे पळापळी करून अनियमितपणा येऊ देऊ नका. आणि तुमच्या अनियमित वागण्याला आता रोखणार तरी कोण आहे? आजपासून तुम्हालातर सुट्टीच आहे! रोजचे हे परिचित घर, घराची प्रत्येक परिचित वीट, अंगणातील प्रत्येक धुलीकण, या सगळ्यांचा आज नेहमीसाठी निरोप घेऊन जाते आहे! शुक्रतारा दिसू लागला आहे, तेव्हा सकाळ होण्यासाठी आता फारसा अवधी उरला नाही. थोड्या वेळानं अंधारातही रस्ते दिसू लागतील, पण त्याच अंधारात

अंधारापेक्षाही अधिक तुच्छ असं माझं शरीर हरवून जाईल.... जाते आहे. सती नावाची कोणी होती ही गोष्ट आता आठवू नका. विनाकारण विचार करून करून शरीराला जास्त शिणवून घेऊन नका. माझं सोनं आहात न तुम्ही!

अंधारातून हळूहळू आपल्या खोलीतून बाहेर येऊन सावधपणे एक वेळ चारी बाजूंना पाहिलं. कुठं कोणी नव्हतं. पावलं न वाजवता नाथ भैयाच्या झोपण्याच्या खोलीच्या दरवाजात जाऊन उभी राहिले. रोजच्या सारखे दार लावलेले आहेत. श्वास थांबवून आतल्या बाजूला पाहिलं. अंधारात काही दिसल नाही. वाटलं, चांगलं आहे. किती कष्टाने आज मनाला आवर घालून त्यांच्या भल्यासाठीच इथला निरोप घेते आहे. जर या वेळी यांचा चेहरा पाहते तर माझ्या मनाचा धीरच सुटला असता! मग जाणं अशक्य झालं असतं.

तिथंच त्याच दरवाजावर डोकं टेकवून नमस्कार केला. आतापर्यंत जितकं धैर्य, जितकी कठोरता मनात साठवून ठेवली होती, ते सगळं क्षणभरात कोसळून पडले.

पदराच्या शेवानं प्राण पणाला लाऊन येणारं रडू आवरलं. आणि तिथून पळत निघाले हळूच अंगणातील दार उघडून बाहेर येऊन उभी राहिले.

वर चांदीच्या तारका जडविलेल्या असीम स्वर्गाखाली असलेल्या परमेश्वरी सृष्टीत आज मी एकटी आहे!

मरायला निघालेली असताना सुध्दा शेवटची इच्छा विचारायलाही कोणीही नाही.

आयुष्यात मला काय काही मिळालं नव्हतं? परंतु दुर्दैवी नशिबाला ते कसं सहन करावं? शेवटी जीवनानं अंतिम ध्येय समजून या पावलाखाली आश्रय पावलांखाली आश्रय मागितला होता, परंतु परमेश्वराने तो आसराही हिरावून घेतला. बाहेर ओट्याच्या भिंतीवर डोके टेकावलं. वाटलं एखाद्या प्रचंड धूमकेतूसारखं माझ्या या जीवनात ज्याच्यावरही दृष्टी टाकली, त्याचा सर्वनाश

केल्याशिवाय सोडलं नाही.

अंधाराच्या विस्तीर्ण साम्राज्यात पुन्हा एकदा कोल्ह्यांनी कोल्हेकुई केली. सकाळ होण्यासाठी आता उशीर नाही. चकित होऊन ओट्यावरून उतरून आले. नक्षत्रांच्या उजेडात घराकडे शेवटची दृष्टी टाकून हे दोन डोळे जिकडे रस्ता शोधीत निघाले. त्या रस्त्याने झप झप निघाले रस्त्याच्या दोन्ही बाजूची झाडं त्या अंधारात दगड होऊन उभी होती, असे वाटत होते की जणू स्वप्नपुरीतील चांदीच्या छडीच्या स्पर्शानं ते सगळे झोपेमध्ये हरवून गेले आहेत. केवळ त्यांच्या आयेमधे काजवे तेवढे चांदीच्या चांदण्यासारखे चमकत होते. मी एका बाजूला पाहात निघून जाते आहे. वाटते आहे, या जन्मात हा रस्ता कधी संपणारच नाही का? कधी कोणास ठाऊक पण थोडा उजेड झाला. गहिरा अंधार फिकट होऊ लागताच गाव दिसू लागला. चालता चालता एकदम थकून एका ठिकाणी उभी राहिले. समोर नदी होती.....

Printed at Kay Kay Printers 150-D Kamla Nagar Delhi - 110007